# कवितार्थरत्नावली.

अथवा

मराठी पांचव्या पुस्तकांतील कवितांवर अन्वयासहित टीका.

हें

पुस्तक

काशीनाथ बाहिरव लिमये

मा० अ० मास्तर व्हरन्याक्युलर स्कूल नंबर १ अहमदनगर.

यांनी केलें,

तें

पुणें येथें

"पुना सिटी प्रेस" छापखान्यांत छापिलें.

वे० शा० सं० रा० रा० श्रीकृष्णशास्त्री तळेकर.

डेप्युटी एज्युक्याशनल इन्स्पेक्टर अहमदनगर.

यांस,

हें

पुस्तक.

त्यांची आज्ञा घेऊन

परम नम्रतेनें आभार पूर्वक

नजर केलें आहे.

---

श्लोक.

बहु श्रम करोनि हे **सुकवितार्थरत्नावली** ॥
रचोनि अति आदरें बुध **तळेकरां** वाहिली ॥
कृपा करुनि ते हिला धरितिल स्वहस्तीं जरी ॥
खरे सफळ होतिल श्रम मदीय सारे तरी ॥ १ ॥

# प्रस्तावना.

हल्लीं शाळाखात्यांत ज्या नवीन इयत्ता ठरल्या आहेत, त्यांत कविता शिकाविणें हा विषय घातला आहे. त्यांत चालू पांचव्या पुस्तकांत तर बऱ्याच कठीण कविता आहेत, त्या मुलांस स्वतां समजण्यास कांहीं साधन असावें ह्मणून हें पुस्तक तयार केलें आहे. आतां ह्या पुस्तकाची शिक्षकांस अंशतः व ट्रेनिंग कालेजांची प्रवेश परीक्षा देऊं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांस बहुशः मदत होईल असा माझा समज आहे.

यांत अन्वयाच्या अनुरोधानें पद्यांवर १,२,३ असे अंक घातले आहेत. पद्यांत ज्या शब्दांचा अर्थ कठीण आहे त्या शब्दांवरील अंक टिपेंत लिहून त्याजपुढें त्या शब्दांचा अर्थ लिहिला आहे व सामासिक शब्दांचा विग्रहही करून दाखविला आहे. आख्यानाचे आरंभीं कथानक दिलें आहे. अभंग व सुलभ ओव्या यांतील कठीण शब्दांची एक याद शेवटीं जोडली आहे. याप्रमाणें योजना केली आहे.

ह्या पुस्तकांत ज्या कवितांचा अर्थ लिहिला आहे त्या कविता वामन मोरोपंतादि जगविख्यात उत्तम कवींच्या आहेत. त्यांतील कित्येक कवितांच्या अर्थांविषयीं मतभेद असण्याचा संभव आहे; तथापि कथेच्या संबंधानें संलग्न व सरळ जो अर्थ दिसला तो लिहिला आहे. आतां याहून विशेष सरळ अर्थ जर आमच्या एकाद्या प्रिय वाचणाऱ्याच्या लक्षांत आला आणि तो जर त्यांनीं आम्हास कळविला तर आम्ही तो आभार पूर्वक स्वीकारूं आणि पुढील आवृत्तींत अवश्य घालूं.

अहमदनगर, ता० १<br>
आगस्ट सन १८७३ इ०.

का० ब० लिमये.

# धेनुहरण.

कोणेएके समयीं विश्वामित्र मृगया करण्या करितां आपल्या प्रधान सैन्यासहवर्तमान अरण्यांत गेला होता. मृगया करितां करितां अतिश्रांत झाल्यामुळें विश्रांति करितां स्थळ पाहूं लागला. इतक्यांत वशिष्ठ ऋषीचा आश्रम त्याच्या दृष्टीस पडला. वशिष्ठाच्या मठांत विश्वामित्र गेल्यावर वशिष्ठानें त्याचें चांगलें आदर आतिथ्य केलें; व त्यास मेजवानीही दिली. विश्वामित्र निघाला त्यावेळेस त्याच्या सैन्यास व त्यास मूल्यवान रेशमी वस्त्रांचा व रत्नांच्या हाराचा आहेर केला; यामुळें विश्वामित्र चकित होऊन शोध करूं लागला कीं, ह्या स्थळीं असे जिन्नस अशा ब्राह्मणास कसे प्राप्त झाले ? शोधाअंतीं त्यास समजलें कीं, त्याजपाशीं कामधेनूची कन्या आहे. हें समजतांच तो ती मागूं लागला. वशिष्ठाच्या मनांत द्यावयाची नव्हती ह्मणून त्यानें पुष्कळ हरकती दाखविल्या. विश्वामित्र तें न ऐकतां बळेंच नेऊं लागला; तेव्हां तिनें आपल्या आंगापासून चार प्रकारचे लोक उत्पन्न केले. त्या लोकांनीं त्याच्या सैन्याचा पराभव केला. ही कथा चित्ररथ गंधर्वानें अर्जुनास सांगितली आहे.—

## आर्या.

पार्थ ह्मणे, तो कोण; ब्रह्मर्षि असे मनोरमहि ज्या तें ॥
तद्यश नसे परिशिलें; सांग सख्या तूं तदीयमहिम्यातें ॥१॥

**अर्थ**—अर्जुन ह्मणाला, तो ब्रह्मर्षि कोण होता ? मी त्याचा मनास आनंद देणारा महिमा ऐकला नाहीं, तर हे सख्या (चित्ररथा) तूं त्याचा महिमा मला सांग.

**टीप**—१ पृथेचा मुलगा पार्थ म्ह० अर्जुन. ४ मनः रम म्ह० रंजविणारें,—मनाला रंजाविणारें. ४ ऋषि शब्दाचा मूळ अर्थ जितेंद्रिय तत्ववेत्ता असा आहे. स्वर्गांत राह-

णाऱ्या नारदादिकांस देवर्षि किंवा नाकर्षि असें म्हणतात. पृथ्वीवर राहणाऱ्या वसिष्ठादिकांस ब्रह्मर्षि म्हणतात. क्षत्रिय असून ज्ञानी झालेल्या जनकादिकांस राजर्षि म्हणतात. १० तत् + यश ह्म० त्याची कीर्ति. १३ ऐकलें. १५ त्वाच्या. १६ महिम्याला. चं०.

**गंधर्व ह्मणे, होता; कुशिकतनुज गाधि कान्यकुब्जपती ॥**
**तत्सुत विश्वामित्र; प्रभु, यत्सेवेसि नृप सदा जपती ॥२॥**

**अर्थ**—गंधर्व ( चित्ररथ ) ह्मणाला कुशिकाचा गाधि ह्या नांवाचा, मुलगा, तो कान्यकुब्ज ( कनोज ) देशाचा राजा होता. त्याचा मुलगा जो विश्वामित्र राजा, ज्याच्या ( विश्वामित्राच्या ) सेवेस राजे देखील नेहमीं तत्पर असत.

**टीप**—३ कुशिक + तनु ह्म० शरीर, + ज. म्ह० झालेला = कौशिक. ५ देश आहे, त्याचा पती म्ह० पालन करणारा (राजा). ७ तत् म्ह० त्याचा, सुत म्ह० मुलगा. १० यत् म्ह० ज्याच्या, सेवेसी म्ह० सेवेला.

**सबळ सचिव तो भूपति; मृगया करितां वनीं बहु श्रमला ॥**
**दैवें वसिष्ट मुनिचें; पुण्याश्रम पद विलोकितां रमला ॥ ३ ॥**

**अर्थ**—तो राजा सैन्य प्रधानासहवर्तमान अरण्यांत शिकार करीत असतां फार दमला आहे, इतक्यांत सुदैवेंकरून वसिष्ट ऋषीचें आश्रमस्थान त्याच्या दृष्टीस पडलें, तें पुण्यकारक स्थान पाहतांच, तो राजा अगदीं रमून गेला.

**टीप**—३ स म्ह० सहीत, बल म्ह० सैन्य. ४ प्रधान. २ भु म्ह० पृथ्वी हिचें. पति म्ह० पालन करणारा = राजा. ६ शिकार. १२ मुनि म्ह० ऋषि. १३ पुण्य + आश्रम म्ह० मठ.

**स्वपदनत गाधिजातें; सत्कारानें मुनि म्हणे आगा राया ॥**
**जावें न क्षुधित त्वां; येऊनियां आमुच्या आगारा या ॥ ४ ॥**

**अर्थ**—आपल्या पायांशीं नम्र झालेला असा जो विश्वामित्र, त्या विश्वा-

मित्राचा सत्कार करून वसिष्ठ त्यांस म्हणाले, हे राजा, तूं ह्या आमच्या घरीं येऊन भुकेलेला जाऊं नये.

**टीप**——१ स्व म्ह० आपल्या, पद म्ह० पायाचे ठायीं, नत म्ह० नम्र झालेला. २ गाधि म्ह० कौशिक यापासून ज म्ह० झालेला = विश्वामित्र. ६ हे. ७ राजा. १३ भुकेलेला. १० घरास.

३ २ १ ६ १६।७ ५ ४
**वाल्मीकिच्या जन जसा; तृप्तिस पावे कुळासकट कवनीं ॥**
१४ १५ ८ ९ १० ११ १२ १३
**मुनिच्या उटजीं तैसा; तो गाधिज भूपहि सकटक वनीं ॥५॥**

**अर्थ**——वाल्मिकऋषींचें कवन ऐकल्यानें सर्व लोकांची आपल्या कुळा सुद्धां जशी तृप्ति होते, त्याप्रमाणें विश्वामित्र राजाची आपल्या सैन्यासह त्या आरण्यांतील वसिष्ठऋषींच्या आश्रमांत तृप्ति झाली.

**टीप**——३ ऋषि होता. त्यानें एक पद्यात्मक ग्रंथ केला आहे. त्याचें नांव वाल्मिकी रामायण. ४ गाणें, पद्य. ११ भू म्ह० पृथ्वी इतें. प म्ह० पालन करणारा. १२ स + कटक म्ह० सैन्यासह. १५ आश्रमांत.

१ २ ७ ५ ८ ६ ४ ३
**नृपति म्हणे कोठुनि हें; आलें साहित्य जेवणा रानीं ॥**
९ १४ १३ १५ ११ १२ १०
***अस्मद्गृहींहि न कधीं; वरिली हे तृप्ति जेवणारांनीं ॥ ६ ॥**

**अर्थ**——राजा ह्मणाला, ह्या रानामध्यें हें जेवणाचें सामान कोठून आलें? ह्या जेवणानें जेवणारांची जशी तृप्ति झाली तशी माझ्या वाड्यांत देखील कधीं झाली नव्हती.

**टीप**——१ अस्मत् × गृहीं म्ह० आमच्या घरीं. १५ मानली १२ समाधान.

१ ३ २ ४ ६ ५ ८ ७
**जें न नृपप्रासादें तें मुनिच्या भुक्तिसुख दिलें उटजें ॥**
१० ११ १२ ९ १५ १४ १६ १३
**हें मोठें नवल अहो लाजविला पारिजात कीं कुटजें ॥ ७ ॥**

**अर्थ**——जें राजवाड्यांत कधींही भोजनसुख मिळालें नाहीं असें (भोजनसुख) ऋषींच्या पर्णकुटिकेंत आज मिळालें. अहो हें मोठें आश्चर्य आहे कीं कुड्याच्या झाडानें कल्पवृक्षास लाजविलें? तसें हें झालें.

---

* त् पुढें गकार असतां द् होतो.

टीप—२ नृप + प्रासादें म्ह० राजवाड्यानें. ५ भोजनसुख. ७ पर्णकुटिकेनें १५ कल्पवृक्ष. १४ कुड्याच्या झाडानें.

३ २ ४ १ ५
**वल्कलरुद्राक्षधर ब्राम्हण अकृतान्ययत्न हा रानीं ॥**
१२ १३ १० ११ ६ ७ ८ ९
**बळ पूजिलें कसें हो बहुमूल्य दुकूल रत्न हारांनीं ॥८॥**

**अर्थ** वल्कलें व रुद्राक्ष धारणकरणारा, ब्रह्मकर्मावांचून दुसरा प्रयत्न न करणारा असा हा ब्राह्मण असतां ह्यानें मूल्यवान रेशमी वस्त्रांनीं व रत्नांच्या हारांनीं हें सैन्य कसें गौरविलें हो! (म्हणजे ह्या अशा रानांत असे पदार्थ कसे प्राप्त झाले.

टीप—३ वल्कलें म्ह० झाडाच्या साळीची वस्त्रें. ४ अ + कृत + अन्य + यत्न म्ह० नाहीं केला दुसरा यत्न जानें. ६ फार मोलाचें. ७ रेशमी वस्त्रें.

२ १ ३ ४ ५ ६ ७ ८
**करितां शोध कळे कीं, उटजीं सुरधेनु नंदिनी आहे ॥**
१० ९ १३ १४ ११ १२ १६ १७ १८ १५
**पाहे तसि नृप म्हणे, मग मुनिला गाय मागतों द्या हे ॥ ९ ॥**

**अर्थ**—राजानें शोध केला तेव्हां त्यास समजलें कीं; ह्या पर्णकुटिकेंत कामधेनूची कन्या नंदिनी नामक आहे; तीस पाहून राजा ऋषीला म्हणाला "ही गाय मागतों" द्या.

टीप—६ कामधेनु म्ह० इच्छिलेलें देणारी. ७ कन्या.

१ २ ३ ४ ७ ६ ५
**अर्बुद गायी देतों, अथवा देतों स्वराज्य भोगाया ॥**
९ ८ १३ ११ १० *१२ १६ १७ १४ १५
**दे गाय, काय विनिमय, हा भवदर्थोन मान्य हो गाया ॥ १०॥**

**अर्थ**—दहाकोटी गायी देतों अथवा भोगण्यास आपलें राज्य देतों; परंतु ही गाय दे. हा मोबदला तुझ्या अर्थापेक्षां (गायीपेक्षां) उणा आहे काय? म्हणून हे वसिष्ठा ह्यास मान्य हो.

टीप—१ दहा कोट. ११ मोबदला. १२ भवत् + अर्थ + ऊन म्ह० तुमचा माल कमी. १५ ह्या गोष्टीस.

१ २ ३ ४ ६ ५ ७+ ८ ९
**मुनिवर म्हणे नृपा हें, वचन तुझें मन्मनासि कंपा दे ॥**

---

* अच्या पुढें उकार आला म्हणजे दोन्ही बद्दल ओ होतो.
+ त्च्या पुढें म आला असतां त्च्या ठिकाणीं न होतो.

१० ११ १२ १४ १३ १५ १६ १७
**या धेनु बळें माझा, हा आश्रमधर्म सांग संपादे ॥ ११ ॥**

**अर्थ**—ऋषीमध्यें श्रेष्ठ असा जो वसिष्ट, तो ह्मणाला हे राजा, ह्या तुझ्या भाषणानें माझ्या मनास कांप सुटला आहे. ह्या गायीच्या योगानें हा आश्रमधर्म (पांतस्थाचें आदर आतिथ्य करणें) यथासांग संपादला जातो.

**टीप**—७ मत् म्ह० माझ्या +मनासी म्ह० मनाला. १६ यथासांग.

५ ६ ४ ७ ८ ३ १ २
**कोण ज्ञाता राज्य, स्वीकार करील आधि ज्या माजी ॥**
१६ १७ १३ १४ १५ १० १२ ९ ११
**मागों नको न देया, हेया हे धेनु गाधिजा माजी ॥ १२ ॥**

**अर्थ**—(वसिष्ट ह्मणाले,) ज्या मध्यें आति दुःखें आहेत अशा राज्याचा कोण शहाणा पुरुष स्वीकार करील? हे विश्वामित्रा, ही माझी गाय देण्यास योग्य नाहीं परंतु तुला टाकण्यास योग्य आहे म्ह०(सोडण्यास योग्य आहे.) यास्तव तूं मागूं नको.

**टीप**—२ मध्यें. ३ दुःख. ९ गाधी पासून झालेला विश्वामित्र. १४ देण्यास १५ टाकण्यास.

१ २ ३ ४ ६ ७ ५
**विश्वामित्र ह्मणे मी, क्षत्रिय आधार जाण तेजाचा ॥**
११ १२ १३ १४ १५ *८ ९ १०
**आज्ञा मानस भंग न, करिती भद्रेच्छु जाणते ज्याचा ॥ १३ ॥**

**अर्थ**—विश्वामित्र ह्मणाला, मी जातीचा क्षत्रिय असून तेजाचा केवळ आधारच आहे (म्ह० मोठा पराक्रमी आहे.) यास्तव जे आपल्या कल्याणाची इच्छा करितात ते माझ्या आज्ञेचा व मनाचा भंग करीत नाहींत (ह्म० मोडीत नाहींत.)

**टीप**—५येथें पराक्रमाचा असा अर्थ. ८भद्र ह्म० कल्याण +इच्छु ह्म०इच्छिणारे.

५ ३ ४ १ २ ९ ७ ८ ६
**स्वाध्याय तुझें बळ तूं ब्राह्मण कैंचें असह्य तेज तुला ॥**
१० ११ १२ १३ १४ १७ १५ १८
**पिप्पलजत्व सम असा दहनीं तेजस्विता न ते जतुला ॥ १४ ॥**

**अर्थ**—तूं ब्राम्हण आहेस; तुझें बळ कायते वेदपठण करण्यांत; तुझ्या आंगीं सहन न होई असा पराक्रम कोठचा. तूं म्हणशील कीं;

* अकारा पुढें इकार आला असता दोन्ही बद्दल एकार होतो.

तुझा व माझा जन्म एकाच पासून आहे तेव्हां तुलाच इतकें तेज कोठलें परंतु असें नाहीं. लाख व अग्नि हीं दोन्ही पिंपळापासूनच उत्पन्न होतात, तथापि अग्नीच्या आंगीं जें तेज आहे तें लाखेच्या आंगीं नाहीं.

**टीप**—५ वेदपठण ७ सहन करण्यास कठीण ८ पराक्रम १० पिंपळापासून होणें १३ अग्नींत १४ प्रकाश १६ लाखेला.

१ २ ३ ४ ५ ७ ६ ९ १० ८
**मान धन प्रभु मी जें वदलों कर्तव्य तें करीन खरें ॥**
११ १२ १३ १४ १८ १९ १७ १५ १६
**ऐसा कोण प्राणी ज्यातें न करील वश हरी नखरें ॥ १५ ॥**

**अर्थ**—मान हेंच आहे धन ज्याचें असा मी राजा आहे. मी जें कर्तव्य म्हणून बोललों, तें खरें करीनच. असा कोणचा प्राणी आहे कीं, सिंह आपल्या नखानें त्याला वश करणार नाहीं?

**टीप**—३ राजा. १५ सिंह. १६ नखानीं.

१ २ ४ ३ ५ ७ ८ ६
**भगवान् वदे बळी तूं तुझिया चतुरंग सैन्य सांगातें ॥**
९ ११ १२ १० १७ १८ १९ १५ १६ १३ १४
**तुज कर्तव्य असे जें सिद्ध न करिसी अभीष्ट कां गा तें ॥ १६ ॥**

**अर्थ**—वसिष्ठ ह्मणाला, तूं बलवान असून तुज बरोबर चार प्रकारचें सैन्यही आहे, तर तुला जें करावयाचें आहे तें आवडतें काम, अरे तूं कां सिद्धीस नेत नाहींस.

**टीप**—१ वसिष्ट. ६ बरोबर. ७ रथ, गज, अश्व, पायदळ असे चार प्रकार. १५ इच्छित.

१ २ ३ ७ ४ ६ ५ ९ ८
**कौशिक अनुगांसि म्हणे सोडा हो धेनु ही चला हाका ॥**
१२ १३ १० ११ १७ १४ १५ १६
**हा काय रत्न-भोक्ता मारू अनुताप पावुनी हाका ॥ १७ ॥**

**अर्थ**—विश्वामित्र आपल्या चाकरांस ह्मणाला, ही गाय सोडा आणि हाका चला. ह्या रत्नाचा (गायीचा) उपभोग हा (वसिष्ट ब्राह्मण) घेणार काय? याला पश्चात्ताप होऊन अशाच हाका मारूं द्या.

**टीप**—१ कुशिकाचा पुत्र विश्वामित्र. २ चाकरांस. १४ पश्चात्ताप. १६ आरोळ्या.

**दंडें ताडुनि नेतां फोडी ती धेनु फार हंबरडे ॥**
**तेव्हां आश्रमवासी द्विज मृग खग देवता कदंब रडे ॥ १८ ॥**

**अर्थ**—काठीनें मारीत नेत असतां ती गाय फार हंबरडे फोडूं लागली; तेव्हां त्या आश्रमांत राहणारे ब्राम्हण, पशु, पक्षी, देवता, ह्यांचा समुदाय रडूं लागला.

**टीप**—१० आश्रम म्ह० मठ + वासी म्ह० वास करणारे, राहणारे. ११ द्वी म्ह० दोनदां आहे ज म्ह० जन्म ज्यास असे ब्राह्मण. १२ पशु. १३ ख म्ह० आकाश ह्याजवर ग म्ह० गमन करणारे असे पक्षी. १४ वास्तुदेवतां. १५ समुदाय.

**नेतां बळेंचि धांवत येउनि ती मुनिपुढें उभी राहे ॥**
**आणूनि लोचनीं जळ बहु दीनत्वें मुखाकडे पाहे ॥ १९ ॥**

**अर्थ**—बलात्कारानें नेत असतां ती गाय धांवत येऊन ऋषीपुढें उभी राहिली आणि डोळ्यांत पुष्कळ पाणी आणून मोठ्या गरीबीनें ऋषीच्या तोंडाकडे पाहूं लागली.

**टीप**—९ डोळ्यांत. १३ त्व प्रत्यय लागला म्हणजे भाववाचक नाम होतें.

**धेनु म्हणे स्वामी त्वां, पालन केलें करी न बाप तसें ॥**
**कां मज उपेक्षिलें हो, मी खळ दंडें उदंड तापतसें ॥ २० ॥**

**अर्थ**—ती कामधेनु वसिष्टास म्हणाली, हे स्वामी, तुम्ही जसें माझें संरक्षण केलें तसें बाप देखील करणार नाहीं. असें असून अहो स्वामी आतां कां माझी उपेक्षा केली? मी ह्या दुष्टांच्या मारानें फार पीडिलें आहे.

**टीप**—१४ हयगय केली. १६ दुष्ट. १७ मारानें. १८ फार. १९ त्रासलें आहे.

**साधु म्हणे मज हृदयीं, शत तुज बाहेर हे कशा लागे ॥**
**मी ब्राह्मण क्षमावान्, माते रडतेस तूं कशाला गे ॥ २१ ॥**

**अर्थ**—वसिष्ठ म्हणाले, हे कामधेनु, हा चाबूक तुला बाहेर एक लाग-

**अर्थ**—त्या गायीनें आपल्या आंगापासून म्लेंच्छ, यवन, शबर आणि शक ह्या चार जातीचे लोक उत्पन्न केले, आणि जसें गरुड पक्षी आपल्या पंखानें माशा उडवून टाकितो तसें त्यांनीं त्या सैन्याची दाणादाण केली.

**टीप**—३ हिंदुलोक द्विपांतरच्या परधर्मी लोकांस म्लेंच्छ ह्मणतात. ४ मुसलमान. ५ भिल्ल. ६ एक नीच जात होती. १० खग ह्म० पक्षी यांत श्रेष्ठ जो गरुड. ११ पंखांनीं. १२ माशा.

**जेंवि दिगंताप्रति नें, तिमिरा तूळा रविप्रभा वात्या ॥**
**सेना तसी नृपबळा, निस्तुळ म्हणती कवि प्रभावा त्या ॥२९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणें सूर्याचाप्रकाश अंधकारास नाहींसा करितो, किंवा मोठा वारा कापसास नाहींसा करितो; त्याप्रमाणें त्या चार जातींच्या लोकांनीं विश्वामित्राच्या सैन्याची दाणादाण करून टाकिली, तेव्हां कवि ह्मणतो, ह्या पराक्रमास तुलना नाहीं.

**टीप**—४ दिक् म्ह० दिशा + अंत म्ह० शेवट. ३ अंधकार. २ सूर्य प्रकाश. ६ वारा. १२ पराक्रमास. १५ निस् म्ह० नाहीं. तुळ म्ह० तुलना ज्यास.

***पकडो लियो हकालो, बे बिसवामितर भाग जावेगा ॥**
**यवन म्हणति दाखविती शब्दीं हरि करिवरासि ज्या वेगा॥३०॥**

**अर्थ**—"धरा, घ्या, हका, अरे विश्वामित्र पळून जाईल" असें यवन लोक बोलले आणि सिंह ज्या वेगानें हत्तीशीं लढतो ह्या आवेशानें ते त्यांच्याशीं लढले.

**टीप**—५ बिश्वामित्र. ११ सिंह. १४ करी ह्म० हत्ती यांतील वर म्ह० श्रेष्ठ.

**मागें पाहों न दिलें, तीं बारा कोस पळविलीं कटकें ॥**
**यश हारविलें तेथें, किति शस्त्रें हार कुंडलें कडकें ॥३१॥**

**अर्थ**—त्या सैन्यास मागें न पाहूं देतां त्यास बारा कोसपर्यंत पळविलें;

---

*ह्या आर्येचा अर्थ हिंदुस्थानी आहे.

त्या ठिकाणीं त्यांचें सर्व यशच हरण केलें मग शस्त्रें हार कुंडलें कडीं कितीं त्यांची काय गणती आहे. तेथें अमित पडलीं.

टीप--१६ कुडक्या. १७ कडीं.

---

# भीष्म प्रतिज्ञा.

भगवान श्री विष्णुनीं दुष्टांचा संहार करण्या करितां कृष्ण अवतार धारण केला. कृष्णानें, कंस, शिशुपाल, वक्रदंत इत्यादिकांचा नाशकरून "मी आपल्या हातीं शस्त्र धरणार नाहीं" अशी प्रतिज्ञा केली. पुढें जेव्हां कौरव पांडवांचें युद्ध होऊं लागलें तेव्हां श्रीकृष्ण पांडवांचा साह्यकारी असल्यामुळें भीष्मानें "मी कृष्णा कडून शस्त्र धरवीन तरच भगवत्भक्त" अशी प्रतिज्ञा केली. भिष्मानें युद्धांत अर्जुनास जरजर केल्या कारणानें त्याचें संरक्षण करण्या करितां कृष्णास शस्त्र धरणें भाग पडलें. यास्तव भीष्माची प्रतिज्ञा शेवटास गेली. ही कथा जनमेजय राजास वैशंपायनानीं सांगितली आहे.—

## श्लोक.

१२ ११ १३ ३ २ ३ ४
प्रतिज्ञा जे केली यदुकुळवरें युद्ध न करीं ॥
१० ९ ५ ६ ७ ८
धरींना शस्त्रातें कदन-समयीं मी निजकरीं ॥
१७ १५ १६ १४ १८ २२ २० २१ १९
घडेना हें मिथ्या जरि तरि न मी भागवत रे ॥
२५ २३ २६ २८ २४ २७
प्रतिज्ञेतें भीष्में मनिं अवधिलें या दृढतरे ॥ १ ॥

**अर्थ**—कृष्णानें, "मी युद्ध करणार नाहीं व युद्धाचे समयीं मी आपल्या हातांत शस्त्र धरणार नाहीं," अशी जी प्रतिज्ञा केली; ही प्रतिज्ञा जर

खोटी झाली नाहीं तर मी भगवद्भक्तच नव्हे या प्रमाणें भीष्मानीं आप ल्या मनांत दृढ पण केला.

**टीप**—१ यादवांच्या कुळांत, वर म्ह० श्रेष्ठ असा जो कृष्ण त्यानें. ५ पुत्र २१ भगवत् भक्त. २७ अधिक दृढ. २८ यांनीं.

**भीष्म पुढें करुनि उठे, प्रथम सुयोधन करावया कंदन ॥**
**विजय पुढें करुनि उठे, धर्म प्रभु जो सुकीर्तिचें सदन ॥ २ ॥**

**अर्थ**—प्रथमतः दुर्योधन भीष्माला पुढें करून (सेनाधिपती करून) युद्ध करण्या करितां उठला; (पांडवांकडे) जो चांगल्या कीर्तीचें केवळ घरच, असा जो धर्मराजा, तो अर्जुनास पुढें करून उठला.

टीप—१४ अर्जुन. ११ घर. स्थान

**वृद्ध तरुण भीष्मार्जुन परि न रणीं न्यून अधिक ते गमले ॥**
**सम लेखार्षि तयांतें जाणुनि तद्भुज —पराक्रमीं —रमले ॥ ३ ॥**

**अर्थ**—म्हातारा भीष्म आणि तरुण अर्जुन जरी होता, तथापि समरांगणांत ते कमी जास्त असें कोणास वाटलें नाहींत. देवऋषि, त्यांस सारखेच जाणून, त्यांचा बाहुपराक्रम पाहून रममाण झाले.

टीप—११ देवऋषि. १५ तत् + भुज म्ह० त्याचे बाहु.

**भीष्माकडे रव भयानक दुंदुभीचा ॥**
**होतां वदे तनय आनकदुंदुभीचा ॥**
**दुश्चिन्ह आजि गमतें मज सव्यसाची ॥**
**जाती शिवा अशिव ती अपसव्य साची ॥ ४ ॥**

**अर्थ**— भीष्माकडे नगाऱ्याचा भयंकर शब्द होत असतां वसुदेवाचा पुत्र जो कृष्ण तो म्हणतो, हे अर्जुना, मला आज बरें चिन्ह दिसत नाहीं, कारण अभद्र कोल्ही (डावी जावी) ती खरोखर उजवी जात आहे.

**टीप**—४ ध्वनी. ३ नगाऱ्याचा. ६ वसुदेव. ७ मुलगा. ९ अर्जुन. १६ भालू. १५ अभद्र. १७ खरोखर.

गर्वोक्ति फाल्गुन वदे जगदेकराया ॥
आहे मशीं कवण तो झगडा कराया ॥
म्यां काळखंज वधिला अतुळप्रतापी ॥
पौलोमही असुर गो-सुर-विप्र--तापी ॥ ५ ॥

**अर्थ**---नंतर अर्जुन मोठ्या गर्वानें ह्मणाला, हे कृष्णा, माझ्याशीं युद्ध करण्यास कोण समर्थ आहे? ज्याच्या प्रतापाची तुलना नाहीं असा जो काळखंज नांवाचा दैत्य; व गायी, देव, ब्राह्मण ह्यांस पीडा करणारा जो पौलोम राक्षस ह्या दोघांचा मी वध केला.

**टीप**---२ गर्व + उक्ति म्ह० गर्वाच्या वाणीनें. १ अर्जुन. ४ जगत् + एक + राया जगाचा एक मालक असा जो ईश्वर श्रीकृष्ण तो. १२ अ + तल + प्रतापी म्ह० नाहीं तुळना ज्याच्या प्रतापाला. १४ गायी. १५ देव. १६ ब्राम्हण. १९ राक्षस. १८ पौलोम नांवाचा राक्षस देखील.

पितामह वदे तदा प्रबळ तूं पृथानंदना ॥
रमेश रथिं सारथी चतुर वागवी स्यंदना ॥
स्वयें गतवयस्क मी सरस वीर तूं रे नवा ॥
भिडे रणधुरंधरा जय घडो सुखें वा नवा ॥ ६ ॥

**अर्थ**---तेव्हां भीष्म म्हणाला, हे पृथा पुत्रा--अर्जुना तूं बळवान आहेस, आणि तुझ्या रथावर सारथी कृष्ण आहे व तो तुझा रथ मोठ्या चतुराईनें चालवितो; मी स्वतां वृद्ध आहे आणि तूं उत्तम नवा वीर आहेस; तथापि हे रणधुरंधरा माझ्याशीं युद्ध कर, मग सुखानें जय प्राप्त होवो अथवा न होवो.

**टीप**---४ कुंतीचा मुलगा- अर्जुन.

पारीक्षिता मग शरासन पांडवानें ॥
ओढूनियां हुतवहार्पित--खांडवानें ॥

तो भीष्म-देह खचिला शरतांडवानें ॥
*ज्याच्या क्रिये सकल पद्मभवांड वाने ॥ ७ ॥

**अर्थ**—हे परिक्षित राज्याच्या मुला पारिक्षिता (जनमेजया), नंतर, ज्यानें अग्नीला खांडव वन आर्पण केलें असा जो पांडव (अर्जुन) त्यानें, ज्याच्या (भीष्माच्या) हस्तक्रियेचें वर्णन सर्व ब्रम्हांड करितें त्या भीष्माचा देह धनुष्यबाण ओढून बाणाच्या समुदायानें अगदीं खचून टाकिला.

**टीप**—३ हुतवह म्ह० अर्पण केलेलें खाणारा असा अग्नि यास अर्पित म्ह० दिलेलें आहे खांडववन ज्यानें. ८ शर म्ह० बाण, तांडवानें म्ह० समुदायानें. १६ पद्म म्ह० कमळ त्यापासून भव म्ह० उत्पत्ति ज्याची असा ब्रह्मदेव याचें अंड तें ब्रम्हांड. १७ वर्णन करी.

गांगेय तापा चढला कसा रे ॥ ज्या मानिती हाच कृतांत सारे ॥
गर्जोनियां सिंहरवें जयातें ॥ पाहे जणो मारिल आज यातें ॥ ८ ॥

**अर्थ**—भीष्म इतका रागावला होता कीं, सर्व त्यास यमच आहे असें मानूं लागले; त्यानें सिंहासारिखी गर्जना करून अर्जूनाकडे पाहिलें तेंव्हां असें वाटलें कीं जसे काय हा खचीत आज अर्जुनास मारिलच.

**टीप**—१ गंगेचा पुत्र भीष्म. ८ कृत म्ह० केलेल्याचा अंत करणारा असा यम. १० सिंह शद्बानें.

त्वां काय कर्म करिजे लघु लेंकरानें ॥
बोलोनियां मग धनू धरिलें करानें ॥
तों व्यापिलें सकल सैन्य महा शरांनीं ॥
ग्रीष्मीं जसा पतित होय हुताश रानीं ॥ ९ ॥

**अर्थ**—भीष्म म्हणाला हे अर्जूना, "तूं लहान मुलानें काय कर्म (युद्ध) करावयाचें आहेस?" असें बोलून त्यानें हातांत धनुष्य घेतलें तोंच जसा ग्रीष्मऋतूंत पडलेला अग्नि सर्व रान व्यापून टाकितो त्याप्रमाणें मोठमोठ्या बाणांनीं तें सर्व सैन्य व्यापून गेलें.

---

*हें विशेषण अर्जुनाकडे लाविलें तरी चालतें.

टीप——१६ हुत म० अर्पण केलेलें अन्न ह्म० खाणें असा अग्नि.

**तो स्तोम येतां बहु सायकांचा ॥ झालाचि पार्थ-व्यवसाय काचा ॥**
**काचावला वीर पुढें धसेना ॥ झाली नृपा सर्व भयांध सेना ॥ १० ॥**

**अर्थ**—तो पुष्कळ बाणांचा समुदाय येतांच अर्जुनाचा हस्तव्यापार ढिलापडला; व तो वीर (अर्जुन) भ्याला व त्यास पुढें होण्यास धैर्य होईना; हे नृपा (जनमेजया) ह्यासमयीं सर्व सैन्य भयानें आंधळें झालें.

टीप——४ समुदाय. ३ बाणांचा. ७ हस्तव्यापार. ८ बंद. १७ भयानें अंधळी.

**शांतवेंन सिंह गमला, पळतां नररथहि तो पळ ससाच ॥**
**ससख प्रभुहि वसंतीं, बहु फुलला होय हो पळस साच ॥ ११ ॥**

**अर्थ**—भीष्म सिंहा सारिखा वाटला आणि अर्जुनाचा रथ पळत असतां तो ससाच आहे असें क्षणभर भासलें म्हणजे (सशाच्या पाठीमागें जसा सिंह लागला असतां तो पुढें पळत असतो तसें ह्या दोघांच्या पळण्याचें सादृश्य दिसलें.) तेव्हां अर्जुनासहित कृष्ण वसंत ऋतूंत फार फुललेल्या पळसा प्रमाणें खरोखर दिसूं लागला. (म्ह० बाण लागून ते दोघे रक्तानें भिजून गेले होते म्हणून तांबडे दिसत होते)

टीप——१ शंतनु राजाचा मुलगा—शांतनव म्ह० भीष्म. ५ अर्जुनाचा रथ. ७ क्षणभर. ९ सख्यासह.

**जिकडे जिकडे पळती, तिकडे तिकडे महाजवन तो बा ॥**
**बहु हाय हाय म्हणती, प्राकृत बुध हंतहा यवन तोबा ॥ १२ ॥**

**अर्थ**—बा जनमेजया, जिकडे जिकडे ते पळत तिकडे तिकडे तो महावेगवान भीष्म आहेच; तेव्हां सैन्यांतील अल्पज्ञानी हाय हाय' शहाणे हंतहा आणि यवन तोबा तोबा असें म्हणूं लागले.

टीप——८ महा वेगवान. १६ मुसलमान. ११, १४, १५, १७ हे शब्द मराठी, संस्कृत, मुसलमानी असून दुःख सूचक आहेत.

**पुष्पवर्ण नटला पळसाचा ॥ पार्थ सावध नसे पळ साचा ॥**
**पाहिलें जंव निदान तयाचें ॥ तों दिसे वदन आनत याचें ॥ १३ ॥**

**अर्थ**---अर्जुन पळसाच्या फुला प्रमाणें दिसूं लागला ह्मणजे (पळसाचें फुल कांहीं ठिकाणीं तांबडें कांहीं पांढरें असतें त्या प्रमाणें त्याच्या पांढऱ्या पोषाखावर रक्ताचे थेंब पडल्यामुळें दिसत होता) व तो क्षणभर देखील सावध नव्हता, त्याचें जेव्हां कारण पाहिलें तेव्हां त्याचें तोंड उतरलेलें दिसलें.

टीप---१ अर्जुन. ९ जेव्हां. ११ कारण. १६ उतरलेलें.

**भीष्म ग्रीष्म-तरणिसा, अर्जुन हेमंत-तरणिसा गमला ॥**
**देव ह्मणे बहु आला, वृद्धाहुनि जिष्णुचाच राग मला ॥ १४ ॥**

**अर्थ**---भीष्म ग्रीष्म ऋतूंतील सूर्या प्रमाणें फार प्रखर व अर्जून हेमंत ऋतूंतील सूर्या सारिखा अति मंद असे दिसूं लागले. श्रीकृष्ण ह्मणाला भीष्मापेक्षां अर्जुनाचाच मला फार राग आला.

टीप---३ सूर्यासारिखा. १० भीष्माहून. ११ अर्जुनाचाच.

**हा पांडवासि भस्माचें, करिल उपेक्षा करूंनये याची ॥**
**पदरीं अकीर्ति आश्रित-सुहृदनवन पथ करून येयाची ॥ १५ ॥**

**अर्थ**---श्रीकृष्ण ह्मणाले, हा भीष्म पांडवाचें (अर्जुनाचें) भस्म करून टाकील याविषयीं हयगय करूंनये; आश्रित व मित्र (पांडव) त्यांचें संरक्षण न करणें हा जो पथ ह्म०मार्ग आचरून आपल्या पदरीं अकीर्ति मात्र येईल.

टीप---६ हयगय. ९सुहृत+अनवन म्ह०मित्रांचें न संरक्षण करणें.

**प्रतोद मग ठेविला उतरला रथाध:स्थळीं ॥**
**ह्मणे प्रबळ भीष्म हा जय घडे न या दुर्बळीं ।**
**करीं कमलनेत्र तो पतित चक्र तें स्वीकारी ॥**
**प्रमाद यमनंदना बहुत या यशस्वी करी ॥ १६ ॥**

टीप—२ सह + उदर = एका उदरांतून जन्मलेले. ८ गज म्ह. हत्ती, अरूढ म्ह. बसलेले. ९ सैन्याचा समुदाय. १८वरील

२ ३ १ ५ ४
तो श्यामकर्ण मग चालतसे पुढारा ॥
६ ७ ९ ८
मागून सैन्यरज पाडित अंधकारा ॥
१३ १२ ११ १०
सोडूनिया चमु तुरंगम तेजराशी ॥
१८ १४ १५ १६ १७
आला त्वरें कढानि वाल्मिकि--आश्रमाशी ॥ ३ ॥

**अर्थ**—नंतर, काळे आहेत कान ज्याचे असा तो घोडा पुढें चालत होता; (त्याच्या मागून सैन्य चाललें होतें) त्याच्या धुराळ्यामुळें मागें अंधकार पडत असे; असें असतां तो तेजःपुंज घोडा सैन्य मागें सोडून फार जलदीनें वाल्मिकऋषीच्या आश्रमास आला.

टीप—३ श्याम म्ह. काळे, कर्ण म्ह. कान ज्याचे असा घोडा. ७ सैन्यापासून निघालेला धुराळा. १२ सैन्य. ११ घोडा. १० तेजःपुंज.

४ १ ५ २ ३
क्रीडा तिथें करितसे लहु बाळवेशें ॥
१० ११ ९ ७ ६ ८
गेला असे वनफळां कुश तो अवेशें ॥
१२ १३ १५ १४ १६
त्या बाळकाजवळ अग्रज तो नसोनी ॥
२० १९ १७ १८
पाहे हयासि लव निर्भयतेकरोनी ॥ ४ ॥

**अर्थ**—त्या आश्रमांत, लहु बाळरूपानें खेळत होता, आणि कुश उल्हासानें वनफळें आणण्या करितां गेला होता. त्या बाळकाजवळ (लवाजवळ) तो वडील भाऊ (कुश) नसतांही तो लहु मनांत कांहीं एक भय न आणतां त्या घोड्यास पाहतां झाला.

टीप—८ उल्हासानें. १५ अग्र म्ह. पहिल्यानें, ज म्ह. उत्पन्न झालेला—वडील भाऊ (कुश). १९ घोड्यास.

१ २ ३ ४
अश्व देखतांचि बाळकासि चोज वाटलें ॥

रुक्मरत्न--भूषणीं म्हणे कसें सुशोभलें ॥
तत्क्षणींच देखिली शिरीं सुवर्णपत्रिका ॥
पाहि बाळ वाचुनी बहूत अर्थ नेटका ॥ ५ ॥

**अर्थ**---तो घोडा पहातांच ह्या बालकास (लवास) कौतुक वाटलें आणि म्हणाला सोनें रत्नें ह्यांच्या अलंकारांनीं हा घोडा कसा चांगला शोभतो आहे, त्यावेळेसच त्या घोड्याच्या मस्तकावर सोन्याची पत्रिका (लिहिलेला पत्रा) पाहिली, तो बालक (लहु) ती वाचून पाहतां त्यांतील अर्थ फार सुबोध होता.

टीप—४ कौतुक ६॥ सोनें. १८सुबोध, लवकर समजण्यासारिखा

(पत्रिकेंतील लेख.)

सूर्यवंशिराघवेंचि हा तुरंग सोडिला ॥
यासि जो धरील तो नृपांत वीर आगळा ॥
सैन्य हें करील युद्ध सोडिना तयावरी ॥
मींच राम येउनी करीन शत्रु--मोहरी ॥ ६ ॥

**अर्थ**—सूर्य वंशांत जन्म घेतलेल्या राघवानें हा घोडा सोडिला आहे आणि जो ह्या घोड्यास धरील तो सर्व राजांत श्रेष्ठवीर. असें समजून त्याज बरोबर हें सैन्य युद्ध करील, आणि युद्ध करूनही सोडिनासा होईल तर मी स्वतां राम येऊन शत्रूचा पराभव करून टाकीन.

टीप—१० जास्त, श्रेष्ठ. २१ पराभव.

पत्रिकार्थ पाहुनी लहू कुमार हांसला ॥
सोडुनी करांबुजें चुरा करोनि टाकिला ॥
अश्वकंठिंची करें सुरम्य माळ काढिली ॥
जानकीसुनंदनें गळ्यांत शीघ्र घातली ॥ ७ ॥

**अर्थ**—तो लहु मुलगा पत्रिकेंतील अर्थ पाहून हांसला आणि आपले हस्तकमलानें ती पत्रिका सोडून तिचा चुरा करूनी टाकिला. नंतर आपल्या हातानें घोड्याच्या गळ्यांतील ती सुंदर माळ काढली आणि त्या जानकीच्या सुपुत्रानें लागलीच आपल्या गळ्यांत घातली.

**टीप**—६ कर म्ह० हात आहेत, अंबुज म्ह० कमलासारिखे अशा हातानें.

अश्वकंठ वेष्टुनी सरम्य वस्त्रपल्लवें ॥
कर्दळींवनांत आणुनी तयास गौरवें ॥
बांधुनी रणांगणांत संगराशि ठाकला ॥
अश्व तो न देखतांचि सैन्यभार लोटला ॥ ८ ॥

**अर्थ**—सुंदर वस्त्राचा पदर घोड्याच्या गळ्यास बांधून, त्या घोड्यास मोठ्या गौरवानें केळीच्या बागेंत आणून, बांधून रणभूमीवर युद्धा करितां उभा राहिला. इकडे तो घोडा दिसेनासा झाला म्हणून तेथें सैन्याचा समुदाय आला.

**टीप**—२ वस्त्राच्या पदरानें. ७ केळीच्या बागेंत. १० रण म्ह० युद्ध, अंगण म्ह० जागा – युद्धाची जागा. ११ युद्धास. १२ उभा राहिला. १७ सैन्याचा समुदाय.

अश्वपाल तेथ येउनी कुमार पाहती ॥
चाप सज्जुनी उभा लहान फार आकृती ॥
दीसतो कुमार हा जसा सकाळचा रवी ॥
धाकुटा परंतु हावभाव फार दाखवी ॥ ९ ॥

**अर्थ**—घोड्याचे संरक्षण करणारे त्या ठिकाणीं येऊन त्या मुलास पाहूं लागले, तों ज्याचा आकार लहान आहे असा धनुष्यास बाण लावून उभा राहिला आहे. तो मुलगा (लहु) सकाळच्या सूर्या प्रमाणें दिसत होता; आणि जरी फार लहान होता, तथापि वीरश्रीचा डौल फार दाखवीत होता.

**टीप**—१ अश्व ह्म० घोडा, यास पाळ ह्म० पाळण करणारे. ४ मुलगा. १९ धनुष्यास बाण लावून. २० वीरश्रीचा अविर्भाव.

**एक जाउनी सांगती सिते ॥ अनर्थ मांडिला तूझिया सुतें ॥**
**कर्दळीवनीं अश्व बांधिला॥त्यानिमित्य सैन्यभार लोटला ॥ १०**

**अर्थ**—ऋषीच्या मुलांपैकीं कित्येक सितेस सांगू लागले कीं, तुझ्या मुलानें फार अनर्थ मांडिला आहे; केळीच्या बागेंत घोडा बांधला त्या करितां येथें सैन्याचा समुदाय आला आहे.

**टीप**—९ केळीचा बाग. १२ त्याकरितां, १३ सैन्याचा समुदाय.

**प्रार्थिलें अम्हीं बाळकोत्तमा ॥देइं सोडुनी या तुरंगमा ॥**
**नायकेच तो हट्ट मांडिला ॥ चापसज्जुनी बाण लाविला॥११॥**

**अर्थ**—आम्हीं, सर्व मुलांत श्रेष्ट असा जो तुझा मुलगा लहु, त्याची प्रार्थना केली कीं, या घोड्यास सोडून दे, परंतु तें न ऐकतां हट्ट घेऊन धनुष्य तयार करून त्यास बाण लाविला.

**टीप**—२ बाळक + उत्तम —बाळांमध्यें उत्तम —लहु. ५ घोडा.

**रुदन तैं करिती जनकात्मजा ॥ कुमति हे उपजे ममआत्मजा ॥**
**धरुनि अश्व जिवावरि ऊठला॥पडतसे धरणीवरि व्याकुळा॥१२॥**

**अर्थ**—हें ऐकतांच जनकाची मुलगी सीता रडूं लागली आणि म्हणाली माझ्या मुलास ही वाईट बुद्धि कोठून उत्पन्न झाली; घोड्यास धरून आपल्या जिवावर उदार झाला आहे. ह्मणून व्याकुळ होऊन जमिनीवर पडली.

**टीप**—२ जनक + आत्मजा म्ह० मुलगी — जनकाची कन्या. १० उदार झाला.

**अर्थ**---नंतर श्रीकृष्ण आपल्या हातचा चाबूक खालीं ठेवून रथा खालीं उतरला आणि ह्मणाला, हा भीष्म फार प्रबळ आहे यास्तव ह्या दुर्बळास (अर्जुनास) जय मिळणार नाहीं. त्या कमलनेत्र श्रीकृष्णानें पडलेलें चाक हातीं घेतलें तेव्हां जसें धर्मास आनंदित केलें तसें भीष्मासही यशस्वी केलें. (भीष्माची प्रतिज्ञा शेवटास गेली त्या योगें त्यास यशस्वी केलें)

**टीप**---२ चाबूक. ४ रथ + अधःस्थळीं म्ह० रथाच्या खालच्या जागीं १६ कमळा सारिखे आहेत नेत्र ज्याचे-- श्रीकृष्ण १९ चाक २२ धर्म २४ भीष्मास.

२ ७ ८ ६ ३ ४ ५
असा येतां देखे रथनिकट तो श्यामल हरी ॥
१ ९ १० १२ ११
नृपा गांगेयाच्या हृदयिं भरल्या प्रेमलहरी ॥
१३ १४ १५ १८ १६ १७
शरातें चापातें त्यजुनि वदला गद्गद रवें ॥
१९ २४ २० २१ २२ २३
जगन्नाथें केलें मज सकल लोकांत बरवें ॥ १७ ॥

**अर्थ**---हे राजा जनमेजया, असा तो श्रीकृष्ण आपल्या रथाजवळ येत आहे असें भीष्मानें पाहिलें तेव्हां त्याच्या अंतःकरणांत प्रेमानें भरतें आलें; आणि तो धनुष्यबाण टाकून गहिंवरून बोलला जगताचा नायक जो श्रीकृष्ण ह्यानें मला सर्व लोकांत चांगलें केलें (ह्म० माझी प्रतिज्ञा शेवटास नेली.)

४ ३ २ १
ये रथावरि झणीं यदुराया ॥
८ ८॥ ७ ६ ५
खड्ग देइन विकोश करां या ॥
१० ९ १३ १२ ११
तोडिं मस्तक पडो चरणां या ॥
१७ १८ १६ १५ १४
धन्य होइन सदाच रणीं या ॥ १८ ॥

**अर्थ**---भीष्म म्हणाला; हे यदुराया कृष्णा लवकर रथावर ये ह्मणजे तुझ्या हातीं नागवा खड्ग देईन; नंतर माझें मस्तक तोड आणि तें ह्या (तुझ्या) चरणावर पडूं दे म्हणजे ह्या रणांत मी सर्वकाळ धन्य होईन.

**टीप**----२ लवकर. ६ हातांत. ७ नागवें.

**तूं हरिसा हरिसाचा, हरिणी सुरसिंधु मीहि पाडससा ॥**
**पाड ससाध्वस हो अरि, हरिचा पावेल काय पाड ससा ॥ १९ ॥**

**अर्थ**——भीष्म म्हणाला, हरी (कृष्णा) तूं खरोखर सिंहा सारिखा आणि भागीरथी माझी आई ही हरणी व मी तिच्या पाडसासारिखा; त्या मला पाड (नाशकर) म्हणजे शत्रु(कौरव)भयाभीत होऊंदे. सिंहाची बरोबरी ससा करील काय? ह्मणजे तुझी माझी बरोबरी होईल काय? (वास्तव तूंच माझा नाश कर.)

**टीप**——३ सिंहासारिखा. ४ सुर म्ह० देव यांची सिंधु म्ह० नदी—भागीरथी ७ हरिणीचें पोर. १०, ११ भय पडूंदे. १४ बरोबरी.

**मारावें मजला असेंच असलें चित्तीं तुझ्या केशवा ॥**
**तें मातें मग कोण रक्षिल पहा विश्वेश नाकेश वा ॥**
**हा मुख्यार्थ जनार्दना मत्त गमे भक्तप्रतिज्ञा खरी ॥**
**कीजे सर्वजगांत होईल मृशा हो आपुली वैखरी ॥ २० ॥**

**अर्थ**——भीष्म म्हणाला; हे केशवा तुझ्या मनांतच मला मारावें असें असेल तर मग महादेव अथवा इंद्र यांच्यानें तरी माझें संरक्षण होईल काय? मला यांतील तात्पर्यार्थ एवढाच वाटतो कीं, भक्ताची प्रतिज्ञा खरी करावी मग आपली वाणी सर्व लोकांत खोटी होईल तर होवो.

**टीप**——८ विश्व म्ह० जगत याचा ईश ह्म० मालक—महादेव. १०नाक म्ह० स्वर्ग याचा ईश म्ह० मालक——इंद्र. ९ अथवा. २१ खोटी. २० वाणी.

**हें भीष्म-वाक्य परिसोनि जगन्निवासें ॥**
**केलें विलोकन मृदुस्मित पीतवासें ॥**
**वेगें फिरोनि चढला मग तो रथातें ॥**
**पार्थाचिया पुरविणार मनोरथातें ॥ २१ ॥**

**अर्थ**——पिंवळें वस्त्र परिधान केलेला व ज्याचा सर्व जगतात वास आहे अशा कृष्णानें हें भीष्माचें भाषण ऐकून, किंचित्

हंसून त्याकडे पाहिलें. आणि अर्जुनाचा मनोरथपूर्ण करणारा असा तो भगवान श्रीकृष्ण लवकर मागें येऊन अर्जुनाच्या रथावर चढला.

टीप---२ जगत् +निवास म्ह. सर्व जगांत ज्याचा वास—श्रीकृष्ण. ७ थोडें हांसून. ९ पीत म्ह. पिंवळें, वास म्ह. वस्त्र. १० अर्जुनाचा.

---

# कुशलवाख्यान.

---

श्रीरामचंद्रजी चवदा वर्षें वनवास भोगून, रावणाचा वध करून सीता शुद्धि केल्यावर अयोध्येस येऊन भरतास भेटले. भरतानें श्रीरामचंद्रजीस राज्यासनीं बसविलें. नंतर जनवार्ता अशी उठली कीं, सीता रावणाचें गृहीं सहा महिने असून रामचंद्रानीं तिचा अंगीकार केला हें बरोबर झालें नाहीं. हें वर्तमान रामचंद्रास कळल्यावर त्यांनीं सीतेचा वध करावा असें मनांत आणून सौमित्रास आज्ञा केली कीं, सीतेस वनांत नेऊन तिचा वध करावा. त्या प्रमाणें लक्ष्मणानें तीस अरण्यांत नेलें. ती गरोदर होती म्हणून तिचा वध न करितां तीस सोडून देऊन, तीस मारिलें अशा विषयीं रामचंद्राची खात्री व्हावी म्हणून चितार्‍या कडून हुबेहुब तिच्या हाता प्रमाणें हात तयार करून तो रामास आणून दाखविला. ती वनांत शोक करीत फिरत फिरत वाल्मिकाश्रमीं आली. तेथें तीस दोन पुत्र झाले, त्यांचीं नांवें लव, कुश, अशीं ठेविलीं. ते दोघेही वाल्मिकाजवळ शस्त्र अस्त्र विद्या शिकले.

इकडे कांहीं काळानंतर अयोध्येस रामचंद्रानीं अश्वमेध आरंभून तत्संबंधी अश्व पृथ्वी जिंकण्या करितां सोडिला. त्याच्या संरक्षणार्थ भरत शत्रुघ्नाची योजना केली. तो शामकर्ण घोडा फिरत फिरत वाल्मिक ऋषीचे आश्रमांत आला. तेथें लहु खेळत होता. त्यानें तो धरिला. इतक्यांत घोड्याच्या कपाळावरील सुवर्णपात्रिका त्याच्या दृष्टीस पडली. लहु ती वांचून पाहतां त्यास असें समजलें कीं, हा घोडा रामचंद्रानी अश्वमेधाकरितां सो-

डिला आहे; म्हणून त्यास बांधून युद्धास तयार झाला. लवानें शस्त्र अस्त्र विद्येमध्यें शत्रुघ्नाचा पराभव केला; परंतु तो पुढें मल्लयुद्धांत पराभव पावला. हें वर्तमान कुशास समजतांच त्यानें भरत शत्रुघ्नाचा पराभव करून त्यास बांधून आश्रमांत आणिलें.—

तें यज्ञकंकण करांबुजिं राघवातें ॥
शत्रुघ्न ते भरत बांधिती आत्महातें ॥
सोडूनि भूमिवरि त्या मग श्यामकर्णा ॥
झांकी रवी नयन देखुनि कांतिवर्णा ॥ १ ॥

अर्थ—ते दोघेजण शत्रुघ्न आणि भरत आपल्या हातानें तें यज्ञ कंकण रामचंद्राच्या हस्तकमलांस बांधते झाले; नंतर त्या श्यामकर्णास पृथ्वीवर सोडिलें तेव्हां त्या घोड्याचें तेज व रंग पाहून सूर्य डोळे झांकू लागला. (इतकें त्याचें तेज जास्त होतें.)

टीप—६ यज्ञ करणाऱ्याच्या हातांत सुताचें कंकण बांधतात तें. ८कर म्ह. हात, अंबुज म्ह. कमल, कमळासारिखे आहेत हात ज्याचे, त्यास. १२ श्याम म्ह. काळे आहेत कर्ण म्ह. कान ज्याचे असा घोडा.

रामासि वंदुनि सहोदर ते निघाले ॥
वाजी गजारूढ रथी दळभार चाले ॥
पादाति चालति नव्हे गणना तयाची ॥
कीं काढिली वरुनि कांति हिमालयाची ॥ २ ॥

अर्थ—ते सखे बंधु (भरत व शत्रुघ्न) रामचंद्रास नमस्कार करून निघाले; घोड्यावर, रथावर, हत्तीवर बसलेला असा सैन्याचा समुदाय चालला होता; आणि पायांनीं चालणारांची (पायदळांची) तर गणनाच होत नव्हती. (सैन्याचा पोषाख पांढरा होता ह्मणून असें वाटे कीं) हिमालय पर्वताची जणो कांतिच काढलीकीं काय? (हिमालयासारिखें पांढरें व विस्तीर्ण दिसत होतें).

दीर्घ रोदन वनीं लहु आयके ॥ कोण गांजित असे मम अंबिके ॥
बाण तीक्ष्णचि शितीं धनुतें करीं ॥ येउनी नमुनि बोलत सुंदरी ॥ १३ ॥

**अर्थ**—लवानें वनांत मोठें रडणें ऐकलें, आणि तो म्हणाला "माझ्या आईला कोण त्रास देत आहे" नंतर धनुष्याच्या दोरीस तीक्ष्ण बाण लावून आपल्या आईकडे आला आणि नमस्कार करून त्या सुंदरीबरोबर (सीतेशीं) बोलूं लागला.

**टीप**—६ माझ्या आईला. ११ धनुष्याच्या दोरीस. १७ सीता.

कासया धरियला हय तो तुवां ॥ काय होय न कळे तुझिया जिवा ॥
येरु वीनवि तुझा सुत मी जरी ॥ आज कां करुनि घेईन मोहरी ॥ १४ ॥

**अर्थ**—(सीता म्हणते) तूं तो घोडा कशा करितां धरिला, त्या पासून तुझ्या जिवास काय होईल, हें कळत नाहीं. लवानें विनंती केली कीं, जर मी तुझा पुत्र आहें तर आज शत्रूकडून मोहरी कां करून घेईन म्हणजे पराभव कां करून घेईन?

**टीप**—४ कशाला. १२ लहु. १९ पराभव. ३ घोडा. १७ मुलगा.

आत्मजें जननिसी समजावुनी ॥ सैन्य बाहिर असे मठ वेष्टुनी ॥
अश्व हींसति बळें घनगर्जना ॥ किंकळ्या द्विरद फोडिति आनना ॥ १५ ॥

**अर्थ**—पुत्रानें (लवानें) आईस (सीतेस) समजाविलें, तों बाहेर सैन्यानें मठास वेढा दिला आहे; घोडे हिंसूं लागले, सैन्यें मेघासारिखी गर्जना करूं लागलीं आणि हत्ती किंकाळ्या फोडूं लागले.

**टीप**—११ सैन्यें. १२ द्वि म्ह० दोन आहेत रद म्ह० दांत ज्यास असा हत्ती १४ तोंडानें.

एक गजावरि एक हयावरि एक रथावरि बैसुनि आले ॥
लावुनियां कवचें धरूनि बरच्या वर सैन्यकराप्रति आले ॥

**गर्जंति वीर धुधाटसमीरण ते रणधीर उताविळ झाले ॥**
**वस्त्र सवारुनि शस्त्र विकल्पुनि अस्त्रहि मंत्रुनि युद्धिं निघाले ॥ १६ ॥**

**अर्थ**---कोणी हत्तीवर, कोणी घोड्यावर, कोणी रथावर बसून आले; आंगांत चिलखतें घालून, वर बरच्या धरून, डाव्या हातांत भाले घेतले होते; असे ते वीर मोठ्या झपाट्याच्या वाऱ्याप्रमाणें गर्जत होते व ते युद्धांत धीर धरणारे, युद्ध करण्यास अगदीं उतावीळ झाले होते; नंतर ते वस्त्रें सावरून, शस्त्रें पाजळून, अस्त्रें मंत्रून युद्धास निघाले.

**टीप**—९ चिलखतें. १४ डाव्या हातांत. १७ झपाट्याचा वारा. २४ सावरून. २६ योजून. २७ युध्दोपयोगी ज्या पदार्थास मंत्राचें साह्य लागतें तें.

**तुंबळ सैन्य विलोकुनियां लहुशीं मग तो मुनि वाल्मिकि बोले ॥**
**हे चमु फार लहू सुकुमार तूं राहिं उगा तुजलागिं न तोले ॥**
**येरु वदे चमु मारिन आजि ऋषी तुमचे निववीन मि डोले ॥**
**ऐकुनि शब्द ऋषी मग स्तब्धचि होउनियां हृदयांतरिं डोले ॥ १७ ॥**

**अर्थ**---अतिशयित सैन्य पाहून तो वाल्मिक ऋषि लहुस बोलला, हें सैन्य फार आहे आणि तूं फार कोमळ आहेस यास्तव तूं उगीच रहा, तुला हें आटोपणार नाहीं; यावर लहु बोलला, ऋषि, हें सैन्य मारून आज तुमचे डोळे शांत करीन; हे शब्द ऐकतांच ऋषि स्तब्ध होऊन अंतर्यामीं डोलूं लागला. म्हणजे अतिशयित आनंदित झाला.

**टीप**—१ मोठें. ११ सैन्य. १५ कोमळ. २० २१ आटपणार नाहीं. २२ लहु. ३८ मनांत.

**देखुनियां अति मार दयाकुळ वाल्मिकि सांगतसे लहुवातें ॥**
**सांनिध साह्य नसे कुश तो तुज यास्तव सोडुनि दे तुरगातें ॥**

१८ १९ २० २३ २२ २१ २४ २६ २८ २७ २५
येरु म्हणे मज साह्य कृपा तुमची मग काय असे भय मातें॥
३३ ३० २९ ३१ ३२ ३६ ३७ ३४ ३५
धन्य म्हणे ऋषि जानकिच्या कुशीं जिंकुनि ये रिपुशी निजहातें॥१८॥

अर्थ—मोठें विघ्न आहे असें पाहून दयाळू वाल्मिक ऋषि लवास सांगू लागला कीं; तुजजवळ तुझा वडील भाऊ कुश तुला साह्य नाहीं, वास्तव घोड्यास सोडून दे. लहु बोलला, "तुमची कृपा साह्य असल्यावर मग मला काय भय आहे" हें ऐकून ऋषि म्हणाले, जानकीच्या उदरीं जन्मून धन्य आहेस; आपल्या हातानें शत्रूस जिंकून ये.

टीप—४ विघ्न १५ घोड्यास. १८. लहु. ३२ उदरीं. ३५ आपल्या हातानें.

४ १ २ ३ ६ ७ ५ ८
बोले लहू त्या भरताऽनुजासी ॥ मी धाकुटा अद्भुत रे तुम्हांसी॥
१३ १० ११ १२ १४ १५ १९ १७ १६ १८
भक्षितसे कीं वडवाग्नि सिंधू॥ कीं तो करी हस्तिं अगस्ति बिंदू ॥१९॥

अर्थ—लहु त्या भरताच्या धाकट्या भावास ह्मणाला, रे मी तुमच्यापेक्षां धाकटा आहे ह्मणून तुलांला मोठा चमत्कार वाटत असेल. परंतु जसा वडवाग्नि समुद्रास खातो किंवा अगस्ति ऋषीनें समुद्राचा एक बिंदु केला, त्याप्रमाणें मी जरी लहान आहें व एकटा आहें तरी तुमचा पराभव करून टाकीन.

टीप—३ भरत + अनुज म्ह॰ भरताचा धाकटा भाऊ. ११ वडवा + अग्नि—घोडीपासून उत्पन्न झालेला अग्नि. १२ समुद्र. १६ एक ऋषि होता.

४ ३ २ ५ ६ ७ १ ७
ऐकोनी शब्द त्याचे मग निजहृदयीं काय शत्रुघ्न बोले ॥
९ १० ८ ११ १२ १३ १४ १५
पृथ्वीमाजी दिसेना लहुसम परि हा मीपणें फार डोले ॥
१८ १६ १७ १९ २० २२ २३ २१ २५ २६ २५
शिक्षा मी यास देऊं परि लघु मुल हें काय होईल कीर्ती ॥
२७ २८ २९ ३० ३२ ३४ ३३ ३१
यालागीं स्तब्ध झाला मग लहु उठला संगरा शूरमूर्ती ॥ २० ॥

अर्थ—हे त्याचें शब्द ऐकून शत्रुघ्न आपल्या मनांत काय ह्मणाला "लहु सारखा पृथ्वीमध्यें कोणी दिसत नाहीं, परंतु हा अहंपणानें फार फुग-

ला आहे. जर मी यास शिक्षा दिली तर हें लहान मुलच आहे, यांत माझी काय कीर्ति होणार आहे;" या विचारांत शत्रुघ्न स्तब्ध झाला; इतक्यांत मुर्तिमंत शूर जो लहु, तो लढाईस उठला.

टीप— ३३ युद्धास. ३१ मूर्तिमंत शूर.

**सांभाळीं बाण माझा म्हणुनि लहु नया नाम गर्जोनि कर्णी ॥**
**वोढोनी सोडि तेव्हां गगन गडगडी जेंवि वीजा सुवर्णी ॥**
**ज्याती झांकोनि डोळे पडति हय-तळीं वीर मूर्छोन यानें ॥**
**शत्रुघ्ना थोर चिंता मृतिसमयिं म्हणे रक्षिजे राघवानें ॥ २१ ॥**

**अर्थ**—लहुनें त्याचें नांव (शत्रुघ्न) मोठ्यानें घेऊन, माझा बाण संभाळ असें म्हणून धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढून बाण सोडले तेव्हां मोठा गडगडाट झाला व ज्या प्रमाणें सुवर्णाच्या विजा चमकाव्या त्या प्रमाणें चमकूं लागले; या योगानें वीरांचे डोळे झांकून जाऊन बेशुद्ध होऊन घोड्याच्या खालीं पडले. तेव्हां शत्रुघ्नाला मोठी चिंता पडली आणि म्हणाला मरण समयीं आमचें रामचंद्रानेंच रक्षण करावें.

टीप—९ कानापर्यंत. २२।२३ घोड्या खालीं. ३१ मरण समयीं.

**असंख्या बाणांचे करुनि तुकडे पाडिव शरें ॥**
**तळीं भेदी वीरां गगनिं उडवी तो किति शिरें ॥**
**कृतघ्नेंशत्रुघ्नें प्रबळ रिपु पाहोनि नयनीं ॥**
**अवाही मार्तंडास्त्रहि शर धनुष्या चढवुनी ॥ २२ ॥**

**अर्थ**—अगण्य बाणांचे तुकडे करून पाडी आणि भुईवर पडलेल्या वीरांस बाण मारी व तो आकाशांत किती शिरें उडवी; याचा अंतच नाहीं कृतघ्न शत्रुघ्नानें असा तो बळवान् शत्रु पाहून, धनुष्यास बाण लावून सूर्यास्त्राचा मंत्र म्हटला. म्ह० योजना केली.

टीप—२४ स्थापी. २३ सूर्यास.

त्यजी त्या अस्त्रातें मग रवि नभीं कोटि दिसती ॥
लहू तें मेघास्त्रा त्यजि दिनमणी सर्व लपती ॥
बुजाले ते भानू न दिसति कदा अभ्रपटळीं ॥
नयीं त्या शत्रुघ्ना कुतुहल दिसे नेत्रकमळीं ॥ २३ ॥

अर्थ---मग तें अस्त्र (सूर्यास्त्र) सोडिलें तेव्हां आकाशांत शेकडों सूर्यच दिसूं लागले यास्तव लवानें मेघास्त्र सोडिलें म्हणून ते सर्व सूर्य लपले; ज्या प्रमाणें कधींही ढगांच्या समुदायांत सूर्य दिसत नाहीं त्या प्रमाणें तेहीं सूर्य अर्थात दिसतनासे झाले. असें जेव्हां झालें तेव्हां शत्रुघ्नाच्या नेत्रकमळांस मोठें कौतुक दिसलें.

टीप---५ आकाशांत. २०ढगांचा पड्दा. २७कौतुक. २८कमळासारख्या नेत्रांत.

सुचिंता शत्रुघ्ना हृदयिं पडली त्यासि बघतां ॥
विलोकोनी बंधू भरत मग बोले नृपसुता ॥
त्यजीं निर्वाणास्त्रा अजुनि नयनीं काय बघशी ॥
रिपू हा नाटोपे यश मज गमे तूं न पवशी ॥२४ ॥

अर्थ---हें पाहतांच शत्रुघ्नाच्या मनांत फार चिंता उत्पन्न झाली असें पाहून भरत त्यास म्हणाला, हे राजाच्या पुत्रा शत्रुघ्ना, शेवटचें अस्त्र सोड अद्यापि डोळ्यानें काय पाहतो आहेस; मला असें वाटतें कीं, हा शत्रु तुला अटपत नाहीं व तुला यशही मिळत नाहीं.

टीप---१३ शेवटचें अस्त्र. २१ आटोपत नाहीं.

साध्य ज्या असति छत्तिस विद्या॥ केंवि बांधिल तयासि अविद्या ॥
शस्त्र अस्त्र न चले मग बुध्या॥ तो करीं करू म्हण मलयुध्या॥ २५ ॥

अर्थ---ज्याला छत्तीस विद्या अवगत आहेत त्याला अज्ञान कसें आडवणार आहे? शस्त्र किंवा अस्त्र चालेनासें झालें ह्मणून शत्रुघ्न बुद्धया ह्मणाला कीं, आपण हातानें कुस्ती खेळूं.

टीप---१८ हातानें. १९ बाहुयुद्ध, कुस्ती.

ते करें धरिति हस्तक ओढुनी ॥ पाडिती मग परस्पर मेदिनी ॥
लाविती रग बहु करपंकजीं ॥ हाणिती दुरुनि धांवुनियां भुजीं॥२६॥

अर्थ—ते एकमेकाचें हात ओढून धरूं लागले, परस्परास भुईवर पाडूं लागले, एकमेकांच्या हस्तकमलास फार कळ लावूं लागले आणि दुरून धांवून एकमेकांच्या दंडांस दंड मारूं लागले.

टीप---२ हातानें. ३ हात. ८ भुईवर. १० कर म्ह० हात, पंकज म्ह० कमल पंक म्ह० चिखल यांत, ज म्ह० उत्पत्ति जाची.

लहु लघू दशरथात्मज मोठा ॥ फिरुनि जाउनि धरी करिं पोटा ॥
उचलुनी मग रथावरि घाली ॥ सकळही चमु सुशीघ्र निघाली॥२७॥

अर्थ---लहु लहान आणि दशरथाचा पुत्र (शत्रुघ्न) मोठा होता. त्यानें (शत्रुघ्नानें) फिरून जाऊन त्याच्या (लहुच्या) पोटास विळखा घातला आणि उचलून रथावर ठेविला तेव्हां सर्व सैन्य लागलीच निघालें.

टीप—३ दशरथ + आत्मज म्ह० मुलगा. १५ सैन्य. १६ फार जलद.

हर्ष मानिति नृपात्मज दोघे ॥ जाहलों ह्मणति आजि अमोघे ॥
घेउनी निघति राघवपुत्रा ॥ चालली निजपुरा चमुयात्रा ॥ २८ ॥

अर्थ—ते दोघे राजाचे पुत्र (भरत शत्रुघ्न) फार आनंद पावले आणि ह्मणाले आज आपण कृतकृत्य झालों; नंतर राघवाच्या पुत्रास (लवास) घेऊन निघाले तेव्हां आर्थात त्यांचें सैन्याचा समुदायही आपल्या शहरास (अयोध्येस) चालला.

टीप---२ नृप म्ह० राजा दशरथ याचे आत्मज म्ह० मुलगे—भरत शत्रुघ्न. ७ धन्य, कृतकृत्य. ९ राघवाचा पुत्र लहु. १३ सैन्याचा समुदाय.

**भूमिजे ऋषीकुमार सांगती ॥ तुझिया सुतें मारिले किती ॥**
**शस्त्रिं अस्त्रिं तो अजिंक जाहला ॥ मल्लसंगरीं बंध पावला ॥ २९ ॥**

**अर्थ**—ऋषींचे मुलगे सीतेस सांगूं लागले कीं, तुझ्या पुत्रानें किती एक मारून शस्त्रअस्त्रयुद्धांत जय मिळविला परंतु सरशेवटी बाहुयुद्धांत बांधला गेला.

**टीप**—१ ऋषि + कुमार म्ह० मुलगे. १३ कुस्तींत, बाहुयुद्धांत.

**बांधुनी तया रथींच घालुनी ॥ वीर गच्छले सैन्य घेउनी ॥**
**वृत्त ऐकतां जानकी पडे ॥ वक्ष भाळहीं ताडुनी रडे ॥ ३० ॥**

**अर्थ**—(ऋषींचे मुलगे सांगतात) त्याला (लवाला) बांधून, रथावर घालून, वीर सैन्य घेऊन गेले. हें वर्तमान सीता ऐकतांच खालीं पडली, आणि ऊर, कपाळ बडवून रडूं लागली.

**टीप**—१३ ऊर. १४ कपाळ.

**शोक तें करी रामअंगना ॥ दाखवा म्हणे आत्मनंदना ॥**
**धावरी कुठें पाहुं लेंकरूं ॥ एकली वनीं काय मी करूं ॥ ३१ ॥**

**अर्थ**—ती रामाची बायको (सीता) शोक करूं लागली आणि म्हणाली "माझ्या मुलाला कोणी तरी दाखवाहो; यानंतर मी आपलें लेंकरूं कोठें पाहूं आणि या वनांत मी एकटी काय तरी करूं"

**टीप**—२ राम + अंगना म्ह० बायको—सीता. ६ आत्म म्ह० माझा, नंदन म्ह० मुलगा.

**शत्रुनें तुज बांधितां रथिं हुंबरा सम बासरा ॥**
**फोडिला असशील तूं मज लागला जिविं झांजरा ॥**
**आजुनी कुश कां नये तुजलागिं सोडवुं या क्षणीं ॥**
**अश्रु ने स्रवती महीवरि दुःख दाटतसे मनीं ॥ ३२ ॥**

**अर्थ**--(सीता ह्मणते) ज्यावेळेस तुला शत्रूनें रथावर बांधलें त्यावेळेस गाई-च्यावासराप्रमाणें हंबरडा फोडला असशील, त्यामुळें मला अतिशयित चटपट लागली आहे. "अद्यापि कुश कां येत नाहीं, ह्या वेळेस तुला सोडविलें असतें." (असें सीतेच्या मनांत येतांच) तिचें अंतःकरण दुःखानें भरून येऊन डोळ्यांतून जमिनीवर अश्रु पडूं लागले.

**टीप**—८ हंबरडा. १३ काळजी; चटपट, २६ गाळणें, टाकणें, २५ पृथ्वीवर,

१ २ ४ ३ ७ ५ ८ ६
**तदा ऋषी वदे पुसें आचिंत तूं वसें सुखें ॥**
१० ११ १२ १६ ९ १५
**कुमार पैल पातला दुरूनि कूश कौतुकें ॥**
१४ १७ १३ १९ २० १८
**कुशास देखुनी सिता रडोनि आळवी शुरा ॥**
२१ २३ २२ २६ २४ २५
**कुमार होय घाबरा पुसे नमूनि सुंदरा ॥ ३३ ॥**

**अर्थ**—तेव्हां ऋषि म्हणाले, (सीते) तूं चिंतारहित रहा, कुश लांबून पलीकडे आला आहे. सीता कुशास पाहून, रडून, त्या शूराचें आर्जव करूं लागली, तेव्हां तो मुलगा (कुश) घाबरा झाला आणि सीतेला नमस्कार करून विचारूं लागला.

**टीप**—७ अ म्ह० नाहीं चिंत म्ह० चिंता. काळजी, ११ पलिकडे. २० आर्जव करी.

२ १ ३ ४ ५ ६
**वृत्तांत सर्व सांगती लहूसि फार वानिती ॥**
७ ८ ९ १० ११ १२
**निदानिं बंध पावला ह्मणूनि त्या अमानिती ॥**
१४ १३ १५ १६ १७ १८
**सुसैन्य तेंचि ओसरे परंतु जानकी झुरे ॥**
२० १९ २१ २२ २३ २४ २५
**बहूत आह्मि सांगतों रडों नको कृपा करें ॥ ३४ ॥**

**अर्थ**—लोक सर्व वर्तमान सांगून लवाची फार वाखाणणी करूं लागले आणि सरतेशेवटीं बांधला गेला ह्मणून त्याची निंदा करूं लागले. सैन्य दूर गेलें परंतु सीता शोक करीतच आहे. आम्हीं पुष्कळ सांगितलें कीं, तूं रडूं नको, येवढी आमच्यावर कृपा कर. परंतु ती ऐकत नाहीं.

**टीप**—६ वाखाणिती. ७ शेवटीं. १४ फार सैन्य.

नेला असेल जरि बाळ महीतळीं तो ॥
ओढूनि काढिन बळें स्वकरें गडी तो ॥
मारीन पन्नग मि फोडिन शेषटाळू ॥
भूगोल हा उलथितां मज नाहीं वेळू ॥ ३५ ॥

**अर्थ**—जरी तो बालक (लहु) पाताळांत नेला असेल तरी तो माझा मित्र मी आपल्या हस्तबळानें तेथून ओढून काढीन मी पाताळांतील सर्प मारीन, शेषाचें मस्तक फोडीन. हा भूगोल (पृथ्वी) उलथा पालथा करावयास मला एक क्षण देखील लागणार नाहीं.

**टीप**—४ पाताळीं ८ मित्र १६ सर्प १९ पृथ्वी २२ वेळ.

माता म्हणे न वधि कैकइआत्मजांसी ॥
बांधोनियां रथिंच घालुनि आण त्यांसी ॥
जा शीघ्र सोडविं सहोदर येश घेईं ॥
ऐकोनि ठेवि निजमस्तक मायपांईं ॥ ३६ ॥

**अर्थ**—त्याची आई (सीता) म्हणाली, कैकईच्या मुलांस (भरत शत्रुघ्नास) न मारतां बांधून रथ वर घालून आण. "लवकर जा आणि आपला सखा भाऊ सोडवून यश मिळीव" हें ऐकतांच त्यानें आपल्या आईच्या पायांवर मस्तक ठेविलें.

**टीप**—३ कैकइच्या पुत्रांस—भरत शत्रुघ्नास, १३ एका उदरांत जन्म घेतलेले—सखे भाऊ,

## घनाक्षरी.

देखतांचि कूश वीर ॥ लहू रथीं धरी धीर ॥ जेंवि सुटतां समीर ॥ नीरदांस चालवी ॥ १ ॥

अर्थ---तो कुशवीर पाहतांच लवास रथावर धीर आला. आणि जसा वारा सुटला असतां तो ढग नाहींसे करितो, त्या प्रमाणें त्यानें भरत शत्रुघ्नच्या सैन्याची दाणादाण केली.

युद्ध करावया उदार ॥ रणीं करी शूर मार ॥ सूर्यकुळीं अवतार ॥ धरी रिपू खालवी ॥ २ ॥

अर्थ---युद्ध करण्यास पुढें, युद्धांत भाडिमार करणारा, सूर्यवंशांत अवतार घेणारा असा जो कुश, त्यानें शत्रूंचा (भरत शत्रुघ्नाचा) पराभव केला.

सैन्यामाजी हाहाकार ॥ झाला वीरक्षोभ फार ॥ आतां कैंचें घरदार ॥ नाहीं थार जावया ॥ ३ ॥

अर्थ---सैन्यामध्यें जिकडे तिकडे हाहाकार झाला आणि वीरांचा मोठा गलबला झाला ते म्हणूं लागले कीं, "आतां कसूचें घर आणि दार, आतां जाण्यास कोठेंही थारा नाहीं."

हाय बोलती वदनि ॥ विघ्न आलें हें कुठूनि ॥ कोणीं जावें रणांगणीं॥ याशिं सम व्हावया ॥ ४ ॥ ॥ ३७ ॥

अर्थ---तोंडानें हाय हाय ह्मणूं लागले, हें विघ्न कोठून आलें, युद्धाच्या जागीं त्याची बरोबरी करण्यास कोणीं हो जावें? असें सर्व सैन्यांतील लोक ह्मणूं लागले.

टीप---१ वारा, २ मेघास. ३ पराभव करी, ४ पुढें, तत्पर, ५ दुःख सूचक शब्द, ६ थारा, ठाव, ठिकाण.

कुश म्हणे रे शत्रुघ्न ॥ थोर होसि रे कृतघ्न ॥ करूनियां थोर विघ्न ॥ लहूबाळ आणिला ॥ १ ॥ आतां करूं दंतभग्न ॥ बाणीं लावूं तुझें लग्न ॥ दुःखसिंधु माजि मग्न ॥ होशी जिवा वेगळा ॥ २ ॥ बहु जाहलासि शूर ॥ आतां करीन मी

चूर ॥ सैन्य सोडूनियां दूर ॥ जासि कुठें संगरीं ॥ ३ ॥ टांग धरूनियां गगनीं ॥ तूज झोंकुं फीरवूनि ॥ स्वर्ग दावूं नयनिं याच क्षणामाझारीं ॥ ४ ॥ ॥ ३८ ॥

**अर्थ**—कुश म्हणाला, रे शत्रुघ्ना, मोठा कृतघ्न होऊन, मोठें विघ्न करून लहु बाळास आणिलास नाहीं? आतां तुझे दांत फोडूं? तुझें बाणाशीं लग्न लावूं? ह्मणजे तूं जो दुःख समुद्रांत बुडाला आहेस तो जिवाराहित होशील. फार शूर झालास नाहीं? परंतु आतां मी तुझा चूर करून टाकितों. आतां ह्या युद्धांत सैन्य सोडून दूर कोठें जाणार आहेस? तुझा पाय धरून आकाशांत झोंकूं? आणि ह्याचक्षणीं तुझ्या डोळ्यांस स्वर्ग दाखवूं काय?

**टीप**—१ दांत पाडणें, २ चिकटवितो, ३ दुःखरूप समुद्रांत, ४ बुडालेला, ५ युद्धांत, ६ क्षणामध्यें,

## श्लोक.

युद्ध तें कधीं तुह्मीं दुणावलें ॥ ह्मणुनि राघवें तुह्मांसि धाडिलें ॥
भ्याड ते तुह्मी ठावकें मला ॥ व्यर्थ नाम शत्रुघ्न हें तुला ॥ ३९ ॥

**अर्थ**—तुह्मीं कधीं युद्धविद्येचा अभ्यास केला आहे काय? म्हणून कीं रामचंद्रानें तुम्हांस पाठविलें? तुम्हीं भितरे आहां हें मला ठाऊक आहे; यास्तव तुला शत्रुघ्न नांव ( शत्रूचा नाश करणारा )व्यर्थ आहे.

**टीप**—५ अभ्यासलें, ११ भित्रे, १७, शत्रुचा नाश करणारा,

यावरी करीं नामसार्थक ॥ साहिं सोडितों तीव्र सायक ॥
बाण लावुनी चाप ओढिलें ॥ मंत्र बोलुनी अस्त्र सोडिलें ॥४०॥

**अर्थ**—आतां तरी तूं आपल्या नांवाचें सार्थक कर ( नांवा सारिखी करणी कर) आणि मी तीक्ष्ण बाण सोडितों तो सहन कर; असें म्हणून

त्यानें (कुशानें) धनुष्यास बाण लाविला आणि धनुष्याची दोरी ओढिली- नंतर तोंडानें मंत्र म्हणून अस्त्रही सोडिलें.

**टीप**—४ तीक्ष्ण. ५ बाण, १० धनुष्य, १४ मुठीसारिखे ज्या मंत्राची प्रेरणा करावी ते पदार्थ दिसतात त्या मंत्रास म्हणतात.

**ऐकोनी मग कैकईसुत म्हणे कां धीट होशी मुला ॥**
**ओंठाचा वरचाहि जार अजुनी नाहीं तुझ्या वाळला ॥**
**हे तुझे बहु शब्द तोंचि समरीं जों गांठि नाहीं मशीं ॥**
**गर्जोनी मग काळदंड त्यजिला घालोनियां आकर्शीं ॥ ४१ ॥**

**अर्थ**—हें बोलणें ऐकून कैकईचा मुलगा (शत्रुघ्न) म्हणाला, मुला, तूं मोठा धीट झाला आहेस नाहीं! परंतु अद्यापि तुझ्या ओंठावरचा जार देखील वाळला नाहीं. "जोंपर्यंत युद्धांत माझ्याशीं गांठ पडली नाहीं तोंपर्यंत हे तुझे फार शब्द." असें मोठ्यानें बोलून त्याला ईर्षेस घातलें. नंतर काळदंड नांवाचें शस्त्र सोडिलें.

**टीप**—१८ युद्धांत. २७ ईर्षेस. ३० नांवाचें शस्त्र आहे.

**देखोनी लहुवाग्रजें निजशरें शस्त्रासि त्या तोडिलें ॥**
**टाकोनी दृढ पाशजाळ भरता पृथ्वीवरी पाडिलें ॥**
**बांधोनी समरांगणीं उभयतां घेऊनियां चालिले ॥**
**तेजस्वी लहुकूश ते यशभरें त्या आश्रमा पातले ॥ ४२ ॥**

**अर्थ**—कुशानें तें शस्त्र पाहून आपल्या बाणानें त्याचे तुकडे तुकडे करून टाकिलें. नंतर बळकट फांसाचें जाळें टाकून भरतास जमिनीवर पाडिलें आणि त्या उभयतांस (भरत शत्रुघ्नास) युद्ध भूमीवर बांधून घेऊन चालले. याप्रमाणें महापराक्रमी जे लहुकूश ते यश मिळवून आपल्या आश्रमास आले.

**टीप**—१ लहुच्या पूर्वी जन्मलेला—कुश त्यानें. ३ आपल्या बाणानें. ७ बळकट ८ फांसाचें जाळें. १४ समर + अंगण म्ह० युद्धाची जागा. १९ महापराक्रमी.

शत्रुघ्नाभरतासि देखुनि दुरी सीता वदे वाल्मिका ॥
लज्जेनें जिव सांडितलि नयना सन्मूख आणूं नका ॥
सांगोनी कुशनंदनासि तुरगापाशींच रे बांधणें ॥
बोले वाल्मिकि तैं कुशास तुरगासंनीध त्यां ठेवणें ॥ ४३ ॥

अर्थ—सीता, भरत शत्रुघ्नास दूर पाहून, वाल्मिकास म्हणाली "माझ्या डोळ्यासमोर आणूं नका. मला पाहून ते आपला जीव लज्जेमुळें सोडूं लागतील यास्तव कुशाला सांगून त्यास घोड्या पाशींच बांधावें. वाल्मिकानें हें भाषण ऐकून कुशास सांगितलें कीं, त्यांस घोड्या जवळच ठेव.

टीप—११ समोर. १७ घोड्याजवळ.

आज्ञेनें गुरूच्या सहोदर कुशें नेवोनियां बांधले ॥
येऊनी लहु तो निवेदुनि नमी सीताऋषीपावलें ॥
आलिंगूनि लवांकुशांसि बसवी मांडीवरी भूमिजा ॥
बोले त्वां श्रम हारिले म्हणउनी चुंबीत वक्रांबुजा ॥ ४४ ॥

अर्थ—कुशानें, आपल्या गुरूच्या (वाल्मिकाच्या) आज्ञे प्रमाणें त्या सख्या भावांस (भरत शत्रुघ्नास) नेऊन बांधिलें, आणि जवळ येऊन सर्व वर्तमान सांगून सीता व ऋषि यांच्या पायांस नमस्कार घातला. सीतेनें त्यास आलिंगन देऊन आपल्या मांडीवर घेतलें आणि तूं माझे श्रम (दुःख) नाहींसे केलें असें ह्मणून त्याच्या मुखकमलाचें चुंबन घेतलें.

टीप—१० सांगून. १९ आतांचें दुःख किंवा उदरीं असतां झालेले कष्ट २० नाहींसें केलें. २२ मुखकमल.

# सुबोध आर्या.

ह्या नीतिपर आर्या कोणी अलिकडील सुकवीनें केल्या आहेत. यांत मनुष्यानें सकाळीं उठून काय करावें, ईश्वर कसा आहे, त्याचीं ह्या जगतांत अद्भुत कृत्यें कोणचीं आहेत, तीं पाहून आपला ईश्वराविषयीं तर्क कसा होतो, धन कसें मिळवावें, त्याचा खर्च कसा करावा, नाश किती प्रकारचे आहेत, संकटांत कामास कोण येतो, मित्र कोणास ह्मणावें, मि-च कसा उपयोगीं पडतो, संगत कोणाची धरावी इत्यादि नीतीच्या गोष्टी ग आहेत;--

प्रातःकाळीं शयना वरुनि उठावें सदा शुचि व्हावें ॥
ध्यावें देवातें मग कर जोडुनियां तयास विनवावें ॥ १ ॥

अर्थ—नेहमीं सकाळीं आंथरुणावरून उठून निर्मळ व्हावें; नंतर ईश्वराचें ध्यान करावें व हात जोडून त्याची प्रार्थना करावी.

देवा परमसमर्था दीनदयाळा प्रभो जगन्नाथा ॥
आलों शरण तुला मी दीन तुझ्या ठेवितों पदीं माथा ॥२॥

अर्थ—हे प्रभो, गरिबावर दया करणारा, सर्व शक्तिमान, जगताच्या मालक अशा ईश्वरा, तुला मी गरीब शरण आलों म्हणून तुझ्या पायावर मस्तक ठेवितों.

टीप—३ गरिबावर दया करणारा. ५ पृथ्वीचा मालक. ७ गरीब. १३ मस्तक.

सृष्टिस्थितिलयकर्ता देवा आहेस तूं जगद्भर्ता ॥
निजदासदुःखहर्ता कोणी नाहींच बा तुझ्या वर्ता ॥३॥

**अर्थ**—हे ईश्वरा, तूं उत्पन्न, पोषण आणि नाश करणारा आहेस व जगाचें पोषण करणारा, आपल्या दासाचें दुःख हरणारा तुझ्यापेक्षां वरिष्ठ कोणीच नाहीं.

**टीप**—४ जगत् + भर्ता म्ह० पोषण करणारा. ५ आपल्या सेवकाचें दुःख हरण करणारा.

ही अद्भुत सृष्टि तुवां देवा केव्हां कधीं कशी केली ॥
याविषयींची आम्हाजीवांची कल्पना विरुनि गेली ॥४॥

**अर्थ**—हे ईश्वरा, त्वां ही चमत्कारिक पृथ्वी केव्हां, कधीं, कशी केली; याविषयींची आम्हा लोकांची कल्पना अगदीं कुंठित झाली आहे, ह्मणजे कांहीं एक चालत नाहीं.

**टीप**—४ चमत्कारिक. १२ सर्व प्राण्यांची. १३,१४ कुंठित झाली.

गगनभवनांत रविशशि अद्भुत हे दीप निर्मिले असती ॥
सारिति दूर तमाला तेजांचे पुंज काय हे दिसती ॥ ५ ॥

**अर्थ**—हे ईश्वरा, त्वां ह्या आकाश मंदिरांत सूर्य चंद्र हे दिवेच निर्माण केले आहेत; ते अंधकाराला नाहींसे करितात. आणि ते केवळ तेजाच्या राशीच आहेत असें दिसतें.

**टीप**—१ आकाश मंदिरांत. ३ सूर्य चंद्र. ५ दिवे. ६ उत्पन्न केले. ८ अंधकाराला. १२ प्रकाशाच्या. १३ राशी.

जैसे रविशशि केले लीलेनें त्वां तसेच हे तारे ॥
केले अनंत तुजविण कोणाला गणवतील बा सारे ॥ ६ ॥

**अर्थ**—ज्या प्रमाणें त्वां आपल्या लीलेनें सूर्य चंद्र केले त्या प्रमाणेंच हे अगण्य तारे (नक्षत्रें) केले आहेत; हे सारे तुजवांचून कोणाला तरी मोजवतील काय? कधीं नाहीं.

**टीप**—३ मौजेनें. ८ अगण्य, ज्याचा अंत नाहीं.

**रविशशिनक्षत्रांहीं कैसें आकाशसदन शोभविलें॥**
**सौंदर्य हें पहाया जीवांचें नयनवृंद लोभविलें ॥७॥**

**अर्थ**—सूर्य, चंद्र, तारे, ह्यांनीं हे आकाश मंदीर कसें शोभायमान केलें आहे? हें आकाशाचें सौंदर्य पाहून आह्मां लोकांचे डोळे अगदीं गर्क होऊन गेले आहेत.

**टीप**—२ आकाश मंदिर. ८ लोकांचे. ९ नयन ह्म० डोळा, यांचें वृंद ह्म० समुदाय. १० लुब्ध झाले.

**हीं पंच महाभूतें त्वां कोठुनि आणिलीं जगामाजी॥**
**अद्भुतशक्ति तुझी बा पाहुनि आह्मी तुला असों राजी ॥८॥**

**अर्थ**—हीं पंचमहाभुतें-म्हणजे पृथ्वी, उदक, तेज, वायू, आकाश ह्या जगांत त्वां कोठून आणलीं? तुझी ही अद्भुत शक्ति पाहून आम्हीं तुला खुष असावें.

**टीप**—१० न झालेली किंवा न होणारी शक्ति. १४ खुष.

**देह अवयवांसुद्धां देवा त्वां अर्पिला अह्मां जीवां॥**
**पोषिसि सुखविशि त्यांतें देवा तूं अर्क जेवि राजीवां॥९॥**

**अर्थ**—हे ईश्वरा, तूं आमचें शरिर अवयवांसहित आम्हांस अर्पण केलें; व ज्या प्रमाणें कमलांस सूर्य त्याप्रमाणें तूं ह्या शरिरांस पोषितोस व सुख देतोस.

**टीप**—४ प्राण्यांस. १० सुख देतोस. १४ कमळास. १५ सूर्य.

**मन बुद्धि इंद्रियें हीं देवा आह्मांस अर्पिलीं बरवीं॥**
**चाळक तूंच तयांचा सत्कार्यें त्यांकडून तूं करवी ॥ १० ॥**

**अर्थ**—हे ईश्वरा, तूं आम्हांस मन, बुद्धि, इंद्रियें हीं चांगली दिलीं आहेत; व तीं चालविणाराही तूंच आहेस ह्यास्तव त्यांजकडून चांगलीं कामें करीव.

टीप---८ दिले. ११ चालविणार. १३ त्या इंद्रियाकडून. १४ सत्+कार्य ह्म० चांगलीं कामें.

**सुविचार मज कळेना माझें मूर्खत्व कळवितों मीच ॥**
**अतिमंदबुद्धि हा मी देवा आहें तुझ्या पुढें नीच ॥ ११ ॥**

**अर्थ**---हे ईश्वरा, मला चांगला विचार कळत नाहीं, हें जें माझें मूर्खत्व आहे तें मीच तुला कळवितों; व मी अतिमंद बुद्धीचा आहें यास्तव तुझ्यापुढें अगदीं गरीब पामर आहें.

**रचितों अपराध सदा आहें मी सर्वथैव अपराधी ॥**
**बालक म्हणोनि सोशीं त्रिजगज्जनका करीं न अपरा धी॥ १२॥**

**अर्थ**---हे ईश्वरा, मी नेहमीं अपराध करितों यास्तव मी सर्वस्वी अपराधी आहें; मी लहान मूलच आहें असें समजून माझें संरक्षण कर व माझ्या ठिकाणीं, हे त्रैलोक्याचे बापा, दुसऱ्या प्रकारची बुद्धि धरूं नको ह्मणजे बापा सारिखी जी बुद्धि आहे तीच राहूंदे.

**टीप**---३ करतों. ८ तीन लोकांचा बाप. १२ दुसरी, वेगळी. १३ बुद्धि.

**दुर्वासनामळाचा लागूं देऊं नको मला लेश ॥**
**अनिवार इंद्रियें हीं नच द्यावा मन्मना तिहीं क्लेश ॥ १३ ॥**

**अर्थ**---हे ईश्वरा, वाईट वासना हाच कोणी मळ हा मला थोडा देखील लावूं नको, म्ह० वाईट इच्छा उत्पन्न करूं नको. न आंवरणारीं अशीं जीं माझीं इंद्रियें त्यांनीं माझ्या मनाला दुःख देऊं नये; (अशी तजवीज कर).

**टीप**---२ वाईट इच्छारूप मळ. ३ थोडा. ८ न आंवरणारीं. १० इंद्रियांनीं. १२ दुःख.

**देवा तव सेवेचा सान्द्रिद्दोचा असो मला छंद ॥**
**कीं साधुसंगतीचा यांतचि वाटो मनासि आनंद ॥ १४ ॥**

अर्थ—हे ईश्वरा, तुझ्या सेवेचा, चांगल्या विद्येचा, आणि साधु संगतीचा मला नाद असून त्यांतच माझ्या मनाला आनंद वाटूं दे.

टीप—४ सत् + विद्येचा म्ह० चांगल्या विद्येचा. ५ नाद.

गर्व मनांत नसावा हेवा कोणासवेंहि न घडावा ॥
अन्यायपथीं माझा देवा केव्हांहि पाय न पडावा ॥ १५ ॥

अर्थ—हे ईश्वरा, माझ्या मनांत गर्व नसावा व कोणाबरोबरही मत्सर घडूं नये; आणि माझा पाय अन्यायाच्या मार्गांत कधींही पडूं नये.

टीप—२ अहंता. ५ मत्सर. ९ अन्यायाच्या मार्गांत.

गुरूचा कीं वडिलांचा न घडावा मजकडून अवमान ॥
चित्तीं खेद नसो जरि नमिळे इतराकडून लव मान ॥ १६ ॥

अर्थ—माझ्या हातून गुरूची किंवा वडिलांची अमर्यादा होऊं नये, आणि यदाकदाचित् दुसऱ्याकडून मला मान जरी मिळाला नाहीं तरी मनांत दुःख वाटूं नये.

टीप—५ अमर्यादा. ११ सत्कार. १४ दुःख.

आत्मस्तुति परनिंदा मिथ्याभाषण कधीं न यो वदना ॥
नैसा नकार त्यांना येती मागावयास जे सदना ॥ १७ ॥

अर्थ—आपली स्तुति, दुसऱ्याची निंदा, खोटें भाषण आणि जे आपल्या घरास भीक मागावयास येतात त्यांस "नाहीं" इतकें माझ्या तोंडानें कधींही येऊं नये.

टीप—५ तोंडास. १० घरास. १४ नाहीं असा शब्द— यागुढं न यो हें क्रियापद गुप्त आहे.

कामक्रोधादिक जे षड्रिपु त्यांचा विनाश तूंच करीं ॥
जिंकावयास त्यांना मी किति आहें तुझ्याच शक्ति करीं ॥ १८ ॥

**अर्थ**—काम क्रोध इत्यादि जे सहा शत्रु आहेत त्यांचा नाश तूंच कर; त्यांस जिकण्यास मी, तुझ्यापुढें, किती समर्थ आहें? यास्तव त्यांस जिंकण्याची शक्ति तुझ्याच हातांत आहे.

**टीप**—३ सहा शत्रु—काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर. १४ हातीं.

**श्रध्दा सध्दर्मावर सच्छास्त्रावर सदा दृढ असावी ॥**
**पाखांडवाद नास्तिकपण यांची अभिरुची मनिं नसावी ॥ १९ ॥**

**अर्थ**—खऱ्या धर्मावर व खऱ्या शास्त्रावर पुरी आस्था असावी; व वितंडवाद आणि ईश्वर नाहीं असें ह्मणणें ह्यांची आवड मनांत कधींही नसावी.

**टीप**—४ विश्वास. ७ खोटावाद. ८ ईश्वर नाहीं असें समजणें. १० आवड.

**तूंच मनोरथपूरक आहेस म्हणोन याचना करितों ॥**
**इच्छा दासाची तूं पुरविशिल अशीच आस मी धरितों ॥ २० ॥**

**अर्थ**—तूं मनोरथ पूर्ण करणारा आहेस यास्तव मी तुजपाशीं यांचना करितों, आणि माझी ही इच्छा तूं पूर्ण करशील अशी मी आशाही धरितों.

**टीप**—२ मनांतील इच्छा पूर्ण करणारा. ५-६ मागतों. १३ आशा.

**मी दीन दीनबंधू तूं तूजवांचोनि कोण दीनातें ॥**
**सांभाळील पहा हें तुजशीं माझें असेंच कीं नातें ॥ २१ ॥**

**अर्थ**—मी गरीब आणि तूं गरिबाचा भाऊ आहेस, म्हणून तुजवांचून माझें संरक्षण कोण करील? तुझ्याठायीं माझें हेंच नातें आहे.

**प्रार्थुनि असें प्रभूला त्याचें साहाय्य त्यास मागावें ॥**
**मग विद्याभ्यासादिक निजकर्म करावयास लागावें ॥ २२ ॥**

**अर्थ**---अशी ईश्वराची प्रार्थना करून त्याजपाशीं त्याची मदत मागावी; नंतर आपलें विद्या अभ्यास वगैरे जें काय काम असेल तें करावयास लागावें.

**कर्तव्य कर्म अपुलें काय असे हें विचारुनि मनांत ॥**
**तें तें करुनि यथाविधि संपादावें भलेपण जनांत ॥ २३ ॥**

**अर्थ**---आपलें कर्तव्यकर्म कोणचें याविषयीं पहिल्यानें मनांत विचार करावा, नंतर तें यथासांग करून सर्व लोकांत चांगुलपण मिळवावें.

**टीप**---११ जसें करावयाचें तसें. १४ चांगुलपण.

**कर्तव्य कर्म पहिलें ईश्वरभक्ती मनांत बाणावी ॥**
**तैशीच योग्यताही देवाची निरुपमेय जाणावी ॥ २४ ॥**

**अर्थ**---मनुष्याचें पहिलें कर्तव्यकर्म हेंच आहे कीं ईश्वराची भक्ति मनांत ठसावी; त्याप्रमाणेंच ईश्वराच्या योग्यतेस जगांत उपमा नाहीं, असेंही समजावें.

**टीप**---६ ठसावी. १० उपमा नाहीं अशी.

**देव अनादि अनंत ब्रम्हांडाचा धनीच हा आहे ॥**
**निजशक्तिनेंचि सारें विश्व व्यापूनि एकला राहे ॥ २५ ॥**

**अर्थ**---ईश्वरास आदिनाअंत, असा हा सर्व त्रैलोक्याचा मालक आहे, आणि तो आपल्या शक्तीनें सर्व जग व्यापून एकटा राहिला आहे.

**टीप**---२ प्रारंभ नाहीं. ३ शेवट नाहीं ११ भरून.

**मोठा पराक्रमी तो परमन्यायी दयालुहि तसाच ॥**
**सत्यत्वशुचित्वादिक जे सद्गुण त्यांत वसति ते साच ॥ २६ ॥**

**अर्थ**---ईश्वर मोठा पराक्रमी, परमन्यायी, फार दयाळु असा आहे, आणि त्यांत खरेपणा, पवित्रपणा इत्यादि जे चांगले गुण तेही आहेत.

**टीप**---८ खरेपणा, पवित्रपणा इत्यादि. ९ चांगलेगुण.

२ ३ ५ ४ १ ६
**निजसत्तासूत्रानें हीं ब्रम्हांडें अनंत तो रचितो ॥**
७ ८ १३ ९ ११ १२ १०
**संरक्षितो बिघडितो ह्मणती यावरुनि फार थोराचि तो ॥२७॥**

अर्थ—ईश्वर आपल्या शक्तीच्या योगानें ह्या ब्रम्हांडासारिखीं अनेक ब्रम्हांडें निर्माण करितो, त्याचें संरक्षण करितो, तीं लयास नेतो, यास्तव "ईश्वर थोर आहे" असें म्हणतात.

१ २ ३ ४ ५ ६
**त्या परमसमर्थानें आम्हां दीनांस नित्य रक्षावें ॥**
७ ८ ११ १२ ९ १० १३
**त्या मातेनें आम्हां बाळांस दया करोनि लक्षावें ॥२८॥**

अर्थ—त्या महासमर्थ ईश्वरानें आम्हां गरिबांचें नेहमीं रक्षण करावें, आणि त्या ईश्वर मायेनें आम्हां बाळांकडे नेहमीं कृपादृष्टीनें पहावें. (अशी आम्ही इच्छा करितों.)

१ २ ४ ३ ५ ६ ७ ८
**हेंअनुसंधान मनीं नित्य असावें कधीं न विसरावें ॥**
११ १० १२ ९ १४ १५ १३ १६
**भय त्याचेंच धरावें चित्तीं कर्तव्य तें मग करावें ॥ २९ ॥**

अर्थ—ही (वर सांगितलेली) गोष्ट नेहमीं मनांत बाळगावी, कधींही विसरूं नये; आणि अंतःकरणांत त्याचें भय धरून आपल्यास जें काय काम करावयाचें असेल तें करावें.

१ २ ३ ४ ७ ५
**कोणाच्या आत्म्याची वित्ताची तशिच हानि देहाची ॥**
६ ८ ९ १० ११ १३ १२
**कीर्तीचीहि करुंनये करितां ती हानि आपली साची ॥ ३०॥**

अर्थ—कोणाच्या प्राणाचा, द्रव्याचा, शरीराचा अथवा कीर्तीचा नाश करूं नये; केल्यास तो खरोखर आपला आहे, असें समजावें.

टीप—२ जिवाची. ३ पैशाची. ११ नाश. १२ खरोखर.

१ २ ३ ४ ५ ६ ७
**अन्याचें मन दुखवी वाइट कामें करावया शिकवी ॥**
८ ९ १० ११ १२ १३ १५ १४
**तो त्याच्या आत्म्याची हानिच करितो असें म्हणति सुकवी ॥३१॥**

अर्थ—जो दुसऱ्याचें मन दुखवितो व दुसऱ्यास वाईट कामें करावयास शिकावितो तो त्याच्या प्राणाचाच नाश करितो असें ज्ञाते ह्मणतात.

टीप—१ दुसऱ्याचें. १० जिवाची. १४ ज्ञाते, शहाणे.

चौर्यानें शौर्यानें कपटानें परधनास जे हारिती ॥
ते त्याच्या वित्ताच्या कावि म्हणती उघड हानितें कारिती ॥ ३२ ॥

अर्थ—जे लोक दुसऱ्याचें द्रव्य, चोरीनें, शूरपणानें, अथव कपटानें हरण करितात ते त्याच्या धनाचा उघड नाश करितात असें कवि म्हणतात.

जीवित्वनाश करणें कीं करणें छिन्न भिन्न देहाला ॥
या कर्में अन्याच्या देहाचा नाश म्हणाति कवि झाला ॥ ३३ ॥

अर्थ—दुसऱ्याचा जीव घेणें अथवा शरीर छिन्न भिन्न करणें; या कृतीनें दुसऱ्याच्या देहाचा नाश झाला, असें कवि म्हणतात.

लोकांमध्यें निंदा किंवा अपमान इतर पुरुषाचा ॥
केल्यास म्हणाति त्याच्या कीर्तीचा नाश होतसे साचा ॥ ३४ ॥

अर्थ—पुष्कळ लोकांत एखाद्या पुरुषाचा अपमान अथवा निंदा केल्यास तो त्याच्या कीर्तीचाच खरोखर नाश केला, असें ह्मणतात.

ऐशी हानि चतुर्विध न घडावी हें सदा मनीं ठेवा ॥
घडतां स्वहानि मोठी आहे कीं हें न आवडे देवा ॥ ३५ ॥

अर्थ—असे चार प्रकारचे नाश घडूं नये असें नेहमीं मनांत आणा, आणि जर घडलेंच तर आपला मोठा नाश आहे असें समजावें; कारण हें ईश्वरास आवडत नाहीं.

अन्यायानें परधन हरितां चित्तांत लाज वाटावी ॥
दुग्ध दधि मधु घृत लोणी असतां विष्टा कशास चाटावी ॥ ३६ ॥

**अर्थ**——अन्यायानें दुसऱ्याचें द्रव्य हरण करतांना मनास कांहीं तरी लाज वाटावी; जसें दूध, दहीं, चांगलें तूप, लोणी असतां मळ कशास चाटावा? तसें चांगल्या मार्गानें द्रव्य मिळवावें.

**टीप**——२ दुसऱ्याचें द्रव्य. ३ घेण्यास. ७ दूध. ८ दहीं. ९ चांगलें तूप.

**न्यायोपार्जित धन तें बहुकाळ टिकोनि फार सुख देतें ॥**
**अन्यायोपार्जित तें सत्वर नासुनि सुखा लया नेतें ॥ ३७ ॥**

**अर्थ**——न्यायानें मिळविलेलें धन फार दिवस राहून त्या पासून आपल्यास सुख होतें, आणि अन्यायानें मिळविलेलें धन लवकर जाऊन तें आपल्या सुखाचाही नाश करितें.

**टीप**——१ न्याय म्ह० न्यायानें, उपार्जित म्ह० मिळविलेलें. १४ शेवटास. नाशास.

**कापट्यें परवंचन करितां चौर्यांत काय भेद असे ॥**
**विश्वासघात न बरा ऐशा करण्यांत पुण्य कीर्ति नसे ॥३८॥**

**अर्थ**——कपटानें दुसऱ्यास ठकविणें यांत आणि चोरींत काय भेद आहे? कांहीं नाहीं, ही चोरीच झाली. विश्वासघात करणें बरोबर नाहीं, अशा ह्या कर्मांत पुण्य नाहीं व कीर्तिही नाहीं.

**टीप**—— १कपटानें २ दुसऱ्यास ठकविणें ४ चोरींत.

**अन्यायोपार्जित तें परधन वमनासमान मानावें ॥**
**तद्भोग रोग केवळ दुःखद हीं भिन्न मात्र या नांवें ॥३९॥**

**अर्थ**——अन्यायानें मिळविलेलें दुसऱ्याचें धन ओके प्रमाणें समजावें; तशा प्रकारें मिळविलेले धनाचा उपभोग केवळ दुःख देणारा रोगच आहे, (यांत भेद इतकाच कीं) नांवें मात्र भिन्न आहेत.

**टीप**——१अन्यायानें मिळविलेलें ४ ओकेप्रमाणें ६ त्याचा उपभोग ८ दुःखदायक १४ वेगळीं.

न्यायें धन मिळवावें त्याचा न्यायेंचि खर्चाहि करावा ॥
वित्ताचा लोभ मनीं अन्यायानें कदापि न धरावा ॥४०॥

अर्थ——द्रव्य न्यायानें मिळवावें आणि त्याचा खर्चही न्यायानेंच करावा; अन्यायानें कधींही पैशाचा लोभ मनामध्यें धरूं नये.

परधन परस्त्रियेचा चित्तीं अभिलाष तूं नकोचि धरूं ॥
अल्पसुखाच्या लाभाकरितां अन्याय वा नकोचि करूं ॥४१॥

अर्थ——दुसऱ्याचें धन आणि दुसऱ्याची स्त्री मिळविण्याची इच्छा तूं कधींही मनांत धरूं नको आणि थोड्या लाभाकरितां तूं कधींही अन्याय करूं नको.

टीप——४ उत्कटणें. ९ थोड्या सुखाच्या.

स्वस्त्रीवांचुनि इतर स्त्री ती माता स्वसा सुता मान ॥
न करी स्पृहा तियेची करितां यमदूत कापितिल मान ॥४२॥

अर्थ——आपल्या बायको वांचून जी स्त्री ती आई, बहिण अथवा कन्या मानावी; आणि परस्त्रीची इच्छा कधींही करूं नये, इच्छा केल्यास यमाचे शिपाई आपली मान कापतील ह्मणजे नाश करितील अथवा वाईट गति देतील.

टीप——५ आई ६ बहीण ७ मुलगी १० इच्छा १४ यमाचे सेवक

कोणासहि योग्य नसे भोगाया परकलत्र परवित्त ॥
चित्त न द्यावें तिकडे चढतें साधूंस पाहतां पित्त ॥४३॥

अर्थ——दुसऱ्याची स्त्री अथवा दुसऱ्याचें धन भोगण्यास कोणीही योग्य नाहीं; आणि दुसऱ्याच्या ह्या गोष्टीकडे कधींही चित्त देऊं नये; चित्त दिलेलें साधूंनीं पाहिलें असतां त्यांच्या कपाळास पित्त चढतें म्ह० तें त्याचा तिरस्कार करितात.

टीप——२ दुसऱ्याची स्त्री. ३ दुसऱ्याचें द्रव्य.

मित्र जयास ह्मणविलें सुज्ञें त्याशीं करूं नये कपट ॥
मन दुखवितां तयाचें होइल कीं नाश आपुला निपट ॥४४॥

अर्थ——ज्याला मित्र म्हटलें त्याजबरोबर भल्या गृहस्थानें कधींही कपट करूंनये; आणि त्याचें मन दुखविलें असतां खरोखर आपला नाश होईल असें समजावें.

टीप——९ भल्या गृहस्थानें १३ खरोखर

इतर न कोणी येतो मित्र जसा संकटांत कामास ॥
मित्रोपकार न फिटे देहाचें नित्य झिजवितां मास ॥ ४५ ॥

अर्थ——जसा संकट समयीं मित्र कामीं पडतो तसा दुसरा कोणीही पडत नाहीं, आणि दररोज आपल्या शरीराचें मास झिजविलें तरी मित्राचा उपकार फिटत नाहीं.

मित्र सुखाचा दाता देतो चित्तास नित्य विश्रांती ॥
समयीं चित्त भ्रमतां बोध करुनियां निवारितो भ्रांती ॥४६॥

अर्थ——मित्र सुख देणारा असून नेहमीं मनास विश्रांति देतो आणि एखादेवेळेस आपलें मन भ्रांतींत पडलें असतां उपदेश करून भ्रम नाहींसा करितो.

टीप——१० बिघडतां. १३ संशय.

सन्मित्र करी जें हित कोणाच्यानेंहि तें न करवेल ॥
साह्य कराया दुर्घट समयीं अन्या न धीर धरवेल ॥४७॥

अर्थ——चांगला मित्र जें आपलें हित करितो तें कोणाच्यानेंही करवणार नाहीं; आणि मोठ्या कठीण समयीं साह्य करण्यास मित्रावांचून कोणासही धीर होणार नाहीं.

टीप——२ सत् + मित्र म्ह० चांगला स्नेही. ९।१० संकटाच्या वेळेस. १३ दुसऱ्याच्यानें.

**जे साधु संत सज्जन त्यांशीं मैत्री अवश्य जोडावी ॥**
**जे खल कपटी दुर्जन त्यांची संगति सदैव सोडावी ॥४८॥**

अर्थ—जे साधु, संत, चांगले लोक याजबरोबर स्नेह अवश्य करावा, आणि जे दुष्ट, कपटी, वाईट लोक यांचा स्नेह नेहमीं सोडावा.

टीप—१० दुष्ट. ११ कपटकरणारे. १५ नेहमीं.

**जीवन यौवन चंचल चित्त तसें वित्तही सदा आहे ॥**
**सत्कीर्ति एक अचला दुसरी अपकीर्तिही तशी राहे ॥४९॥**

अर्थ—जिवंत राहणें, तारुण्य, मन हीं जशीं चंचळ आहेत त्याप्रमाणेंच द्रव्यही नेहमीं चंचळच आहे म्ह० स्थिर नाहीं; आणि ज्याप्रमाणें एक चांगली कीर्ति नेहमीं राहणारी आहे त्याप्रमाणेंच दुसरी अपकीर्तिहि नेहमीं राहणारी आहे.

टीप—१ जिवंत राहणें. २ तारुण्य. ३ फिरणारें. ७ द्रव्य.

**दुःख परासि न द्यावें सत्य वदावें क्षमा न सोडावी ॥**
**जोडावी कीर्ति जनीं नय मर्यादा कदा न मोडावी ॥५०॥**

अर्थ—दुसऱ्यास दुःख देऊं नये; खरें बोलावें, क्षमा सोडूं नये म्ह० दुसऱ्यावर क्षमा करीत जावी; या योगानें जगांत कीर्ति मिळवून न्याय आणि मर्यादा कधींही मोडूं नये.

टीप—७ दया. १३ न्याय. १४ मार्ग.

# सीतारामायण.

---

अयोध्येस दशरथराजा राज्य करीत होता. त्यास कौसल्या, सुमित्रा आणि कैकेयी अशा तीन बायका होत्या. त्यांपासून राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न असे चार पुत्र झाले. राजधर्माप्रमाणें विश्वामित्रानें आपल्या यज्ञाचे संरक्षणार्थ रामलक्ष्मणास दशरथापासून मागून नेलें.

कांहीं दिवस लोटल्यावर जनकाकडून सीतेच्या स्वयंवराकारितां विश्वामित्रास बोलावणें आलें. विश्वामित्र आपल्याबरोबर रामलक्ष्मणास घेऊन जनकाच्या घरीं गेला. तेथें रामचंद्रानें शिवधनुष्याचा भंग केला, ह्मणून जनकानें आपली कन्या जानकी रामास दिली व आपल्या पुतण्यांपैकीं ऊर्मिळा लक्ष्मणास, मांडवी भरतास, आणि श्रुतकीर्ति शत्रुघ्नास दिली. लग्नसोहळा अटोपल्यावर ते सर्व आपल्या घरीं आले.

दशरथ म्हातारा झाल्यावर रामास गादीवर बसवूं लागला तेव्हां कैकेयीस असें वाटलें कीं, आतां आपल्या पूर्वींच्या वराचा उपयोग करण्याची चांगली संधी आहे; म्हणून तिनें आपल्या मंथरा दासीच्या विचारानें दशरथास असें सांगितलें कीं, रामलक्ष्मणानें चवदा वर्षें वनवास भोगावा आणि माझ्या भरतानें राज्य करावें; त्याप्रमाणें राम लक्ष्मण आणि सीता ह्यांनीं चवदा वर्षें वनवास भोगला. हे वनांत असतां रावणानें सीतेस चोरून नेलें. राम रावणास मारून सीतेस घेऊन घरीं आल्यावर वनवासांत ज्या ज्या गोष्टी घडल्या त्या सीतेनें आपल्या जवांस सांगितल्याचें वर्णन पुढील कवितेंत आहे.—

## श्लोक.

१ २ ३ ६ ७ ४ ५
श्रीजनकसुता सीता —प्रभृति सुखें भेटल्या स्वसा जावा ॥
८ ९ १० १३ १२ ११ १४
तत्संवाद वदावा सज्जन पावुनि मह स्व साजावा ॥ १ ॥

**अर्थ**—जनकाची कन्या सीता ही आहे प्रमुख ज्यांत अशा त्या बाहिणी व जावा एकमेकीस भेटल्या; आणि त्यांच्यांत जें संभाषण झालें तें सांगावें ह्मणजे साधु लोकांस आत्म आनंद होऊन ते त्या आनंदानें शोभोत.

**टीप**—१ जनकाची मुलगी. ३ प्रमुख. ४ बाहिणी. ५ दिराच्या बायका. ८ तत् + संवाद म्ह० त्यांचें संभाषण. १२ आनंद. १४ शोभावा. ११ आत्मसंबंधी.

**भरताची मांडवी स्त्री लक्ष्मणाचीहि ऊर्मिळा ॥**
**श्रुतकीर्ति रिपुघ्नाची जगीं यत्कीर्ति दुर्मिळा ॥२॥**

**अर्थ**—(कोण कोणाच्या जावा तेथें होत्या)? तर भरताची बायको मांडवी, लक्ष्मणाची ऊर्मिळा, शत्रुघ्नाची श्रुतकीर्ति; ह्या अशा होत्या. ज्याची (ज्या जावांची) कीर्ति ह्या जगांत दुर्मिळ आहे. ह्मणजे त्या तोडीची कीर्ति दुसऱ्याची नाहीं.

**टीप**—६ रिपु + घ्न म्ह० शत्रूचा नाश करणारा. ८ यत् म्ह० ज्यांची कीर्ति.

**पडुनि गळां गहिंवरल्या, सीतेच्या कन्यका तशा गमल्या ॥**
**श्रमल्या विरहें श्रीनें, भेटुनि कुरवाळितां करें शमल्या ॥३॥**

**अर्थ**—जेव्हां त्या स्त्रीया सीतेच्या गळीं पडून गहिंवरल्या तेव्हां त्या सीतेच्या कन्याच आहेत असें वाटलें; वियोगामुळें त्यांस फार दुःख झालें होतें ह्मणून सीतेनें त्यांस भेटून कुरवाळलें तेव्हां त्यांचे दुःखाचा परिहार झाला.

**टीप**—८ वियोगदुःखानें. १० सीतेनें. १२ हातानें. १४ शांत झाल्या.

**म्हणति सुदिन भाग्यें आजि हें प्राप्त जालें ॥**
**अमृत परमरुग्णा वांचवायास आलें ॥**
**सुभगिनि चवदा कीं कल्पसे अब्द गेले ॥**
**स्वसम सावि निजेनें निष्ठुर स्वप्न केले ॥४॥**

**अर्थ**—ह्या तिघी जावा सीतेला ह्मणतात—आज हा चांगला दिवस आह्मांस मोठ्या नशीबानें प्राप्त झाला; जसें एखादा मोठ्या रोग्याला नांव

विण्याकरितां अमृत यावें तसें तुझें येणें आम्हांस झालें. हे वहिणी (तुझ्या वियोगाचीं हीं) चवदा वर्षें कल्पाप्रमाणें गेलीं. आणि हे सखे, झोंपेनें आपल्या सारिखें स्वप्न देखील निष्ठुर केलें म्हणजे आम्हांस चवदा वर्षांत झोंप तर आलीच नाहीं परंतु झोंपेचें स्वप्न देखील पडलें नाहीं.

**टीप**—८ मोठ्या रोग्यास. १४ वर्षें. १५ युगाप्रमाणें.

४ ३ १ ५ २ ८ ९ ६ ७
**वृत्त सर्व सखि सांग आपलें, सूक्तिनें निविव चित्त तापलें ॥**
१० १३ ११ १२ १४ १८ १६ १७ १५
**दर्शनें पुरलि सर्व कामना, या नसो श्रवणकाम कां मना ॥५॥**

**अर्थ**—हे सखे सीते, तूं आपला सर्व वृत्तांत सांगून आमचें जें मन फार त्रस्त झालें आहे तें मधुर भाषणानें शांत कर; तुझ्या दर्शनानें आमची सर्व इच्छा तृप्त झाली; यास्तव या मनालाच (वृत्त) ऐकण्याची इच्छा कां नसावी?

**टीप**—८ चांगल्या भाषणानें. १६ ऐकण्याची इच्छा.

२ ३ ५ ४ ८ ६ ७
**आलिंगुनि कुरवाळुनि हुंगुनि शिर पुसुनि लोचनें पदरें ॥**
१ १० ९ १२ ११ १४ १३
**श्री सांगे निजवृत्त श्रवणीं ज्याच्या उरोंनयेचि दरें ॥६॥**

**अर्थ**—सीता त्या जावांस आलिंगन देऊन, हातानें कुरवाळून, त्यांचीं मस्तकें हुंगून, आपले पदरानें त्यांचे डोळे पुसून आपला वृत्तांत सांगूं लागली; तो वृत्तांत असा होता कीं, ऐकला असतां मनांत पापाचें भय राहूंच नये.

**टीप**—३ शीर हुंगणें हें, तोंडावरून हात फिरविणें, अ लाबला घेणें हे जे प्रीति दाखविण्याचे प्रकार आहेत त्यांपैकीं पूर्वीं होतें. १२ ऐकल्यानें. १३ पापभयानें.

१ ६ २ ३ ४ ५ ७
**भावोजी चित्रकूटीं परतुनि नगरा न्यावया शीघ्र आले ॥**
१० ११ १२ १२ १३ ९ ८ १४ १५
**माझे डोळे तुम्हांतें निरखुनि बहु हे तेधवां तृप्त झाले ॥**
१६ १७ १८ २२ १९ २० २१
**स्वामीच्या पादुकांतें वरुनि परतले बोध मानूनि मागें ॥**
२३ ३० २७ २८ २९ २५ २६ २४
**विप्रांच्या मानिले हो परम सुख अविभ्रत्व पावोनि वागें ॥७॥**

**अर्थ**—(भरत) भावोजी फार जलदीनें आह्मांस पुन्हां अयोध्येस नेण्या करितां चित्रकूट पर्वतावर आले, तेव्हां हे सख्यांनो, तुह्मांला पाहून माझे डोळे तृप्त झाले; नंतर भरत भावोजी रामाच्या पादुका घेऊन, रामाचा बोध ऐकून माघारे परतले; व आह्मीं चित्रकूट पर्वतावर असल्यामुळें तेथील ब्राह्मणांच्या यज्ञास कांहींएक विघ्न आलें नाहीं ह्मणून त्यांस फार आनंद झाला.

**टीप**—२३ ब्राम्हणांच्या. २४ यज्ञानें. २५ निर्विघ्नपणा.

**देउनि अभय मुनीतें, आशीर्वाद प्रसाद जोडून ॥**
**अत्र्याश्रमासि गेले, स्वामी तो चित्रकूट सोडून ॥८॥**

**अर्थ**—त्या ऋषींस अभय वचन देऊन, त्यांचा आशीर्वाद हाच प्रसाद संपादून, रामचंद्र तो चित्रकूट पर्वत सोडून अत्रिऋषीच्या आश्रमास गेले.

**टीप**—१ रामचंद्र. ११ अत्रि + आश्रम म्ह० अत्रिऋषीचें आश्रम म्ह० घर.

**चालाति माझ्या मागें, लक्ष्मणजी काननीं पुढें स्वामी ॥**
**धामीं तशीच हर्षें, चाले पाहोनि आपल्या स्वामी ॥ ९ ॥**

**अर्थ**—अरण्यांत माझ्या मागें लक्ष्मण भावोजी आणि पुढें स्वामी चालत असत. घरीं जशी वागत असे तशीच अरण्यांतही आपलें सर्वस्व रामचंद्रच आहे असें मानून मोठया हर्षानें चालत असे.

**टीप**—१ अरण्यांत. ८ घरीं. १२ प्राण, सर्वस्व.

**जैसे वसिष्ठ गाधिज, जेंवि भरद्वाज गुरु तसे अत्री ॥**
**नमिले शमिलेखर्षभ, जे सुधवळ मानसीं जसे पत्री ॥ १० ॥**

**अर्थ**—जसे वसिष्ठ, विश्वामित्र, भरद्वाज रामाचे गुरु होते तसेच हे अत्रिऋषिही गुरुच होते; त्यांना आह्मीं सर्वांनीं नमस्कार केला; जसे

मानस सरोवरावरचे पांढरे पांढरे शुभ्र राजहंस पक्षी असतात, तसे हे अत्रिऋषि, मनानें पापरूपमलरहित व अत्यंत शांत असे होते.

**टीप**—३ विश्वामित्र ९ मनांत किंवा मानससरोवरांत ११ राजहंस १० फार पांढरे "अत्यंत पवित्र." १३ शामि, लेख ऋषभ—देवामध्यें श्रेष्ठ—इंद्र, शामींद्र, शामि म्ह० शांत इंद्र म्ह० श्रेष्ठ—अत्यंत शांत.

१ २ ३ ७ ६ ४ ५
**जेंवि भरद्वाज तसे, द्रवले पाहोनि तेहि मामाजी ॥**
१४ १२ १३ १० ८ ९ ११
**झाले अतितर सुखकर, कर जैसे भानुचे हिमामाजी ॥ ११ ॥**

**अर्थ**—जसे भरद्वाज ऋषि आह्मांस पाहून द्रवले तसे हे (अत्रिऋषि) मामाजी द्रवले; आणि जसे थंडींत सूर्याचे किरण फार सुखदायक होतात, तसे ते आम्हांस अत्यंत सुखदायक झाले.

**टीप**—५ सासरा ७ दया आली ९ सूर्याचे ११ थंडींत.

१ २ ४ ७ ३ ५ ६
**तद्भार्या अनुसूया मजवरि करि सासु मायसी माया ॥**
८ ९ १३ ११ १४ १२ १०
**स्वकरेंचि अळंकारी आहे प्रेमासि काय सीमा या ॥ १२ ॥**

**अर्थ**—अत्रिऋषीची बायको अनुसूया सासुबाई माझ्यावर आईप्रमाणें प्रीति करीत; आणि आपल्या हातानें मला अलंकारीत, तर अशा ह्या प्रीतीला सीमा आहे काय?

**टीप**—१ तत्+भार्या म्ह० त्याची बायको ५ आईप्रमाणें ९ अलंकार घालीत.

३ ४ ५ २ १ ७ ६
**वेणी घालुनि लोचनीं निजकरें ती लेववी कज्जळ ॥**
९ ८ १० ११ १५ १२ १३ १४
**लावी चंदन सुव्रता मज गमे गंगाचि तें तज्जळ ॥**
१८ १७ १६ १९ २० २१ २२
**गुंफी सत्कुसुमें शिरीं सुरुचिरा माळा गळां अर्पुनि ॥**
२७ २८ २९ २५ २६ २३ २४
**प्रेमें धर्म कथी सुधाधिकरसें सूक्तें मला तर्पुनी ॥ १३ ॥**

**अर्थ**—ती आपल्या हातानें माझी वेणी घाली, व मजकडून डोळ्यांत काजळ घालवी, आंगास चंदन लावी. ती साध्वी गंगा आणि तें चंदन तिचें (गंगेचें) पाणीच आहे असें वाटे. माझ्या डोकींत उत्तम प्रकारचीं

फुलें गुंफीत असे; आणि माझ्या गळ्यांत उत्तम प्रकारच्या माळा घालून, या प्रकारें मला संतुष्ट करून, अमृतापेक्षांही मधुर अशा भाषणानें व मोठ्या प्रेमानें धर्म सांगत असे.

**टीप**—६ काजळ १२ तत् + जळ म्ह० तिचें पाणी १७ सत् + कुसुमें म्ह० चांगलीं फुलें. १९ अतिसुंदर. २५ सुधा + अधिक + रसें म्ह० अमृतापेक्षा अधिक रसानें. २६ सु + उक्ति म्ह० चांगल्या भाषणानें २४ तृप्त करून.

**तैसाचि मल्ललाटीं साध्वी सिंदूर तिलक जो लावी ॥**
**तोहि अगतसार सदा कैसी तत्सुकृतसिद्धि बोलावी ॥ १४ ॥**

**अर्थ**—तसाच माझ्या कपाळावर त्या पतिव्रता अनुसूयेनें जो शेंदुराचा टिळा लाविला होता तो मळीण न होतां नेहमीं जशाचा तसाच असे. अशी जी साध्वी तिचा पुण्यमहिमा काय वर्णन करावा?

**टीप**—३ मत् + ललाटीं म्ह० माझ्या कपाळावर. १० मळीण न होणारा. १३ तत् + सुकृत + सिद्धि म्ह० पुण्यमहिम्याचें फळ.

**तो अंगराग चिरकाल तसाचि ओला ॥**
**यत्सौरभीं भ्रमरपंक्ति सदैव लोला ॥**
**घ्राणेक्षणांसि म्हणती कुसुमेंहि डोला ॥**
**वेणी नवीच न सतीयश शक्य बोला ॥ १५ ॥**

**अर्थ**—(तिनें लावलेली) उटी नेहमीं तशींच ओली असे; व तिच्या सुगंधास भुंग्यांचा समुदाय नेहमीं लुब्ध असे; डोकींतील फुलें सुवासिक होतीं ह्मणून नाकास, दिसण्यांत सुंदर होतीं म्हणून डोळ्यास, फुलांनीं असें काय सांगितलेंच आहे कीं, तुम्ही डुलतच रहा, व माझी वेणीही नेहमीं नवीच असे; असा त्या साध्वीचा महिमा बोलण्यास देखील शक्य नाहीं (अवर्णनीय आहे.)

**टीप**—२ उटी. ६ यत् म्ह० ज्याच्या, सौरभीं म्ह० सुगंधास ७ भुंग्यांचा समुदाय ९ लुब्ध. ११ घ्राण म्ह० नाक, ईक्षण म्ह० डोळा ह्यांस १० फुलें.

**उष्णा उटी हिमीं ती उष्णांही सर्वकाळ परम हिमा ॥**
**वृष्टि न मदतिक्रम करि साध्वीचा नवदवोचि पर-महिमा ॥ १६ ॥**

**अर्थ**—थंडीच्या दिवसांत ती उटी ऊष्ण असे, व नेहमीं उन्हाळ्यांत फार थंड असे; असें असतांही पर्जन्य माझी अमर्यादा करीत नसे म्ह० (उटीमुळें) मला लागत नसे; (असें ज्या साध्वीचें कृत्य) तिचा श्रेष्ठ महिमा सांगवतच नाहीं. (माझ्यानें तिच्या महिम्याचें वर्णन करवत नाहीं.)

**टीप**—१० मत् + अतिक्रम म्ह० माझी अमर्यादा. १४ श्रेष्ठ महिमा.

**वत्से मांडवि, मद्विवाह-चरित प्रेमें पुसे ती सती ॥**
**सांगावी मज लागली निज-मुखें सर्वा कथा तीस ती ॥**
**आशीर्वाद बहू प्रसन्नहृदया दे मायसी लोभवी ॥**
**त्या आर्येसि तसेंच हेसिहि महा-वात्सल्य हें शोभवी ॥ १७ ॥**

**अर्थ**—हे मुली मांडवी, जेव्हां त्या साध्वीनें माझ्या लग्नाची गोष्ट मोठ्या प्रेमानें विचारली तेव्हां मला ती सर्व कथा आपल्या तोंडानें सांगावी लागली. ती कथा ऐकून तिचें अंतःकरण फार प्रसन्न झालें आणि मला तिनें आशीर्वाद देऊन माझ्या आईप्रमाणें मजवर लोभ करूं लागली; हा कृपाळूपणा, ज्या प्रमाणें माझ्या पृथ्वी मातेस शोभवितो, त्या प्रमाणें ह्या अनुसूयेसही शोभा देत आहे.

**टीप**—५-६मत् + विवाह + चरित म्ह०माझ्या लग्नाचें चरित्र. १८प्रसन्नहृदयाची. २३लोभ करी. २९,३० मोठा कृपाळूपणा

**मग तेथुनि उर्मिळे निघाले ॥ प्रभु जों दंडककाननीं रिघाले ॥**
**धरि राक्षस तों शरीर हातें ॥ नच हे हे नसतां शरीर रहातें ॥ १८ ॥**

**अर्थ**—हे उर्मिळे, मग तेथून रामचंद्रजी निघून जों दंडकारण्यांत आले तों माझें शरीर तो राक्षस (विराध) हातानें धरूंलागला; तेव्हां हे धनुष्यबाण धारण करणारे (रामलक्ष्मण) जर त्या समयीं नसते तर हें शरीर राहिलें नसतें.

**टीप**—८ शिरले. १५ धनुष्यबाण धारणकरणारे, (रामलक्ष्मण).

**स्वामिंनीं वधुनि तापसारिला ॥ त्याक्षणें सकळ ताप सारिला ॥**
**हा विराध सुरमान्य तारिला ॥ तुंबुरु-प्रबळ-शाप वारिला ॥ १९ ॥**

**अर्थ**—स्वामींनीं (रामचंद्रजींनीं) ऋषींचा शत्रु जो विराध राक्षस यास मारून त्याच वेळेस त्यापासून होणारा जो त्रास तो नाहींसा केला. देवांस मान्य असा जो विराध राक्षस यास मुक्त केलें, व त्याला तुंबुरूचा जो मोठा शाप होता तोही नाहींसा केला.

**टीप**—२ तापस + अरिला म्ह० ऋषींच्या शत्रूस ९ देवांस मान्य ११ मुक्त केलें १२ नांवाचा ऋषि. त्यानें दिलेला मोठा शाप.

**लोपामुद्रापति श्रीघटजमुनि जिहीं प्राशिला सिंधु अन्या ॥**
**सांगावी ख्याति काय त्रिभुवन-महिता सत्तपःसिद्धिजन्या ।**
**प्रेमें मानूनि पुत्रापरि रघुवर हे मानिली होहि कन्या ॥**
**दिव्यें शस्त्रें दिलीं हो म्हणुनि वरि जयश्री दुजी कीर्ति धन्या ॥२०॥**

**अर्थ**—लोपामुद्रेचा पति जो अगस्तिऋषि; ज्यानें समुद्र पिऊन टाकिला व ज्याची कीर्ति, उत्तम तपाच्या सिद्धी पासून उत्पन्न झाली आहे, व जी त्रिभुवनास पूज्य आहे, ती दुसऱ्यास काय सांगावी? त्यानें रामलक्ष्मणांस पुत्राप्रमाणें व मला कन्येप्रमाणें मोठ्या प्रीतीनें मानून त्यांस उत्तम प्रकारचीं शस्त्रें दिलीं; म्हणूनच हे सख्यांनो, यश व दुसरी उत्तम कीर्ति स्वामींस प्राप्त झाली.

**टीप**—२ घट + ज म्ह० घटापासून झालेला आहे जन्म ज्याचा असा—अगस्ति. ७ पूज्य ८ सत् + तपः + सिद्धि + जन्या म्ह० उत्तम तपाच्या सिद्धीपासून उत्पन्न झालेली ३० प्राप्त झाली.

**त्यावरि मामाजींचे गृध्रेंद्र सखे जटायु या नांवें ॥**
**स्नेहाब्धि भेटले हो त्यांचे साधुत्व काय वानावें ॥ २१ ॥**

**अर्थ**—त्या नंतर मामाजींचे मित्र गृध्रपति जटायु या नांवाचे व जे स्नेहाचे केवळ समुद्रच ते भेटले; त्याचा साधुपणा काय वर्णन करावा?

टीप——४ गृध्र + इंद्र म्ह० गिधाडांतील श्रेष्ठ ५ स्नेह + अब्धि म्ह० स्नेहाच समुद्र.

२ १ ३ ४ ५ १२ ६ ७
**आम्हां ते वदले स्वतातसदना आलां सुखें या वनीं ॥**
१३ ११ ८ १० ९
**वर्ता पंचवटीस्थळीं मुनिनुतीं गोदातटीं पावनीं ॥**
१४ १५ १६ १७ १८ १९ २१ २०
**मत्स्वामी विनयें असें विनविती बा हे स्नुषा आपली ॥**
२३ २२ २८ २७ २४ २५ २६
**रक्षावी समयीं निवो मति इची स्वादर्शनें तापली ॥ २२ ॥**

**अर्थ**——आह्मांला ते (जटायु) ह्मणाले, "तुम्ही आपल्या वडलाच्याच घरीं आलां आहांत;" यास्तव ह्या वनांत ऋषींस मान्य व पवित्र करणारी अशा गोदावरीच्या कांठीं पंचवटींत खुशाल रहा. नंतर माझ्या स्वामींनीं (रामचंद्रांनीं) मोठ्या नम्रतेनें अशी विनंती केली कीं, "ही आपली सून आहे, हिचें ह्या समयीं रक्षण करावें;" व आपले दर्शन न झाल्यामुळें तिला झालेला ताप आपल्या दर्शनानें नाहींसा होवो.

**टीप**——१३ रहा. ८ ऋषीस मान्य. ९ पवित्र करणारी. १४ माझे स्वामी. १५ नम्रपणानें. २१ सून. २५ स्व+अदर्शनें म्ह० आपल्या वियोगानें.

१ ७ ८ ६ २ ३ ४ ५
**स्वामी मातें नेति गोदावरीतें ॥ यद्वातेंही चित्त मोदा वरीतें ॥**
९ ११ १० १२ १७ १८ १४ १५ १६ १३
**भावोजीनीं निर्मिली पर्णशाला ॥ तैसें दे ना रत्न वा स्वर्ण शाला ॥ २३ ॥**

**अर्थ**—ज्या गोदावरीच्या वाऱ्यानेंही मनास आनंद होतो, त्या गोदावरीला स्वामी (रामचंद्र) मला नेते झाले. त्या ठिकाणीं भावोजींनीं (लक्ष्मणानीं) पर्णकुटिका (पानांची झोंपडी) बांधली, त्यापासून इतकें सुख होई कीं, तसें सुख रत्न अथवा सुवर्ण ह्यांपासूनही होणार नाहीं.

**टीप**——२ यत् + वातें म्ह० जिच्या वाऱ्यानें. ४ आनंदास. १० पानांची झोंपडी. १३ शा ह्य० सुख-याला. १६ सोनें.

**निववी मज मातासी, श्रीमत्त्र्यंबकजटोद्भवा गंगा ॥**

**स्मरणें स्तवनें स्नानें, शुचि करि ती विश्वचित्तवागंगा ॥ २४ ॥**

**अर्थ**——श्रीमत् त्र्यंबकेश्वराच्या जटेपासून उत्पन्न झालेली जी गंगा (गोदावरी) ती मला आईप्रमाणें सुख देई; ती (गोदावरी) स्मरण केलें असतां सर्व जगाचें मन, स्तुति केली असतां वाणी, आणि स्नान केलें असतां आंग, पवित्र करी.

**टीप**——१ श्रीमत् + त्र्यंबक ह्म० शंकर याच्या, जटा + उद्भव ह्म० जटेपासून उत्पन्न झालेली. १० विश्वचित्त ह्म० जगांतील लोकांचें मन, वाक् ह्म० वाणी, अंग ह्म० अंगाला.

**ये म्हणवाया भेदुनि, शोकघनें वत्स हा तदा विवशी ॥**

**स्वाम्याज्ञेनें तीतें, हा लक्ष्मण वत्स हात दावि वशी ॥ २५ ॥**

**अर्थ**——तेव्हां शोकरूप घणानें वक्षस्थळ फोडून मला "हाय हाय" ह्मणविण्याकारितां ती राक्षसी (शूर्पणखा) आली; तिला, आपल्या स्वाधीन इंद्रियें ठेवणारा असा जो लक्ष्मण बालक, ह्यानें स्वामीच्या आज्ञेवरून हात दाखविला. (नाक थान कापिलें.)

**टीप**——३ शोकरूप घणानें. ४ वक्षस्थळ, हृदय. २ राक्षसी. १३ स्वामी + आज्ञेनें. १० जितेंद्रिय ह्म० जिंकलीं आहेत इंद्रियें ज्यानें—लक्ष्मण.

**श्रीसीतेतें तिघीही पुसति सुभगिनी प्रेमळा जेंवि आली ॥**

**कोणाची कोणगे ती मळमति विवशी सांग कोठूनि आली ॥**

**दुष्टेनें काय केलें सुमुखि सकळही वृत्त तें आयकोंदे ॥**

**बाई दुःखें सुखेंही चरित परिसतां आमुचा काय कोंदे ॥ २६ ॥**

**अर्थ**——मैत्रीणी प्रमाणें त्या तिघींही बहिणी आनंदित होत्सात्या सीतेस विचारूं लागल्या कीं, हे सुंदरी, सीते, ती दुष्टबुद्धि राक्षसी कोणाची कोण, कोठून आली व तिनें काय केलें वगैरे हें सर्व वर्तमान आह्मांस ऐकूंदे;

बाई सीते, हें वर्तमान ऐकत असतां आमचें शरीर सुखदुःखानें अगदीं कोंडून जातें ह्मणजे भरून जातें.

**टीप**—२प्रेमळ अंतःकरणाची. ३ सखी. ९ वाईट बुद्धीची. १० राक्षसी. ३० शरीर. ३१ भरून जातें.

**सांगे भूमिसुता दशास्यभगिनी मांसाशनें मातली ॥**
**नामें शूर्पणखा कुबुद्धि विधवा नक्तंचरी पातली ॥**
**मायारूपवती प्रभूसि भुलली मोहीं स्मरें घातली ॥**
**ती त्यांच्याहि गळां पडे मति तुझी ज्यांच्या पदीं रातली ॥ २७ ॥**

**अर्थ**—सीता सांगे कीं, रावणाची बहीण शूर्पणखा नांवाची, मांस खाऊन मस्त झालेली, दुष्टबुद्धि, विधवा, राक्षसी आली. कपटरूप धारण करणारी ती रामास पाहून भुलली आणि मदनानें वेडी झाली, आणि (हे ऊर्मिळे) ज्याच्या पायीं तुझी बुद्धि रममाण झाली आहे असा जो लक्ष्मण, त्याच्याही गळीं पडली.

**टीप**—१भूमि म्ह० पृथ्वी, हिची सुता ह्म० मुलगी. ३दश म्ह० दहा आहेत आस्य म्ह० मुखें ज्यास असा रावण त्याची बहीण शूर्पणखा. ४मांस खाण्यानें ८वाईट बुद्धीची १० नक्त म्ह० रात्र, चरी म्ह० फिरणारी. १२ कापटी सुस्वरूप धारण करणारी. १५मदनानें. २२रममाण झाली.

**मला आहे स्त्री, हो मदनुजनिसौमित्रिदयिता**
**वधू तूं योग्या त्या सुमुखि गुणरूपातिशयिता ॥**
**असें स्वामी तीतें कथिति, हित ती मानुनि, भजा ॥**
**ह्मणे मातें त्यातें, तिस म्हणति ते, भानुनिभ जा ॥ २८ ॥**

**अर्थ**—मला बायको आहे, यास्तव तूं माझा धाकटा भाऊ जो सुमित्रेचा मुलगा लक्ष्मण त्याची बायको हो. हे सुंदरवदने तो अतिशयित गुणवान व रूपवान आहे ह्मणून त्याला तूं योग्य स्त्री आहेस असें स्वामींनीं तीस सांगितले, तें तिला हितकारक वाटून ती त्यातें (लक्ष्मणास) ह्मणा-

ली, "माझा स्वीकार करा;" तेव्हां सूर्यासारिखी आहे कांति ज्याची असे ते लक्ष्मण भावोजी, यांनीं तिला जा म्हणून सांगितलें.

**टीप**—४मत् + अनु+जनी + सौमित्री + दयिता म्ह० माझा धाकटा भाऊ जो लक्ष्मण त्याची स्त्री. १९,२४लक्ष्मणास. २१,२५मला (सूर्पणखेस). २३भानुनिभ म्ह० सूर्यासारिखा. तेजस्वी—लक्ष्मण.

२ ३ ४ १ ६ ५ ७ ८ ९ १०
**या आर्यांच्या पदांचा सुदति सतत मी दास तूं काय दासी॥**
११ १७ १८ १२ १६ १३ १४ १५
**होसी? मत्स्वामिनी हो सुमुखि भज तया मानदा कायदासी ॥**
२० २१ १९ २२ २३ २७ २५ २६ २४
**ऐसें जें उर्मिळे त्वत्प्रियतम वदला ये पुन्हा तन्मना तें ॥**
३३ ३४ ३० २७ २८ २९ ३१ ३२
**लावूं पाहे प्रभूशीं समुचित नसतां सद्यशा जन्म–नातें ॥ २९ ॥**

**अर्थ**—हे सुदति, सीताराम यांच्या पायांचा मी निरंतर दास आहे आणि ( तूं माझी बायको होऊन ) तूं काय त्यांची दासी होणार ? हें बरोबर नाहीं. तर हे सुमुखी (शुर्पणखे) "(साधूस) मान देणारा व शरीर देणारा त्यास भज ( पूज्य मान ) आणि माझी धनीण हो." हे उर्मिळे असें तुझे प्राणप्रिय ( लक्ष्मणजी ) बोलतांच तेंहीं बोलणें तिच्या मनास आलें. मग उत्तम कीर्ति आहे ज्याची असा जो प्रभू रामचंद्र, त्याशीं आपण योग्य नसतां जन्माचें नातें लावूं लागली.

**टीप**—१ चांगले आहेत दांत जिचे. ३ श्रेष्ठांच्या (रामांच्या) १४ मान देणारा. १५ काय म्ह० शरीर, द म्ह० देणारा—रामचंद्रास. २२ त्वत् म्ह० तुझा, प्रियतम म्ह० नवरा.

१२ १३ १ २ ३
**प्रभूंसि कळली खरप्रकृति रम्यकोषा सुरी ॥**
४ ५ ६ १ ७ ८ १० ११
**तशी वरि बरी जशी रुचिर मूर्ति योषा सुरी ॥**
१५ १४ १८ १९ २० २१ २२ २३
**गमे मजहि धी गुणीं जरिहि रंगली लाज न ॥**
२४ १६ २५ २७ २६ १७
**त्यजी सुकुलज स्वयें नुघडि अंगलोला जन ॥ ३० ॥**

**अर्थ**—उत्तम म्यानांत बसविलेली तीक्ष्ण धारेची एकादी सुरी असून ती जशी बाहेरून दिसते त्याप्रमाणें ही बाहेरून देवांगनें प्रमाणें सुंदर परंतु आंतून दुष्ट स्वभावाची आहे असें रामचंद्रास समजलें. ( सीता म्हणते )

मलाही असेंच वाटलें, कारण उत्तम कुळांतील स्त्रीजनास जरी दुसऱ्याचें गुण आवडले तरी तो स्वतां लाज सोडीत नाहीं व आपले अंगचे हावभाव उघड करून दाखवीत नाहीं. (आणि तिनें दाखविलें म्हणून ती नीच कुळांतील आहे असें सहज लक्षांत आलें.

टीप---२ रम्य म्ह० सुंदर, कोषा म्ह० म्यानाची. १०स्त्री. ११देवस्त्री १८बुद्धि. २१ गढली. १६ चांगल्या कुळांत उत्पन्न झालेली २७न । उघडी. २६ हावभाव.

**प्रभूंतें म्हणे हें पहा आंग लीला-वती मी वरावें मला चांगलीला ॥**
**स्तवी दाखवी तो सखे आस्य काय॥स्वयें तें पहातां नये हास्य काय॥ ३१॥**

अर्थ---स्वामींला (रामचंद्रास) म्हणाली "हें पहा माझें आंग, मी फार सुंदर आहे, मला चांगलीला तुह्मी वरा" याप्रमाणें तिनें आपल्या तोंडाची फार स्तुति करूं लागली व ती स्वतां आपलें शरीर दाखवूं लागली, तर हे सखे, तें पाहून हंसूं येणार नाहीं काय?

टीप---७ सुंदरी. ११सखे. १४तोंड. १६ शरीर.

**कृत्याशी क्रुद्धा ती, माझ्या मंदेंहि केलि गे हास्यें ॥**
**प्रभु-देखतांहि धांवे, मज खाया भीतिकेलिगेहास्यें ॥ ३२ ॥**

अर्थ---अगे माझ्या थोड्याच हंसण्यानें ती पिशाची फार रागावली आणि रामचंद्रादेखत, (तिचें तोंड केवळ भीतीचें क्रीडास्थान तें) तोंड पसरून मला खावयास धांवली.

टीप---३ पिशाची. ७ रागावलेली. ५,६ थोड्या हांसण्यानें. ११भीतीचे, केलि म्ह. क्रीडेचें, गेह ह्म० स्थान जें आस्य म्ह. तोंड तें.

**भ्यालें मी स्वामींनीं, हूं म्हणतां क्रोधमद तिचा मथिला ॥**
**लक्ष्मण भावोजींनीं, केला जो दंड तो तुम्हां कथिला ॥३३॥**

अर्थ---मी भ्यालें, तेव्हां स्वामी रामचंद्रांनीं हूं ह्मणतांच तिचा राग व मस्ती नाहींशी झाली, या शिवाय लक्ष्मण भावोजींनीं जी तिला शिक्षा केली ती तुम्हांस सांगितलीच आहे.

टीप—७ राग आणि मस्ती. ८नाहींसा केला, १२शिक्षा.

६ ४ ३ २ ५ १ १०॥
कथूं दुर्दशा ती तिची काय गे हा ॥
११ १० ७ ९ ८
वदे स्वापराधें कुधी जाय गेहा ॥
१४ १५ १२ १३
खरा बंधुला अन्यथा आरडोनी ॥
१६ १७ १८ २१ २० १९
स्वयें ताप सांगे करी आ रडोनी ॥ ३४॥

अर्थ—अगे, तिची दुर्दशा तरी काय सांगू! ती दुष्टबुद्धि आपण स्वतां अपराध करून हाय हाय म्हणत आपल्या घरीं गेली, व आपल्या खर नांवाच्या भावाला, अन्य प्रकारें ओरडून, स्वतां आपल्यास झालेला त्रास सांगितला, आणि भोकाड पसरून रडूं लागली-

टीप—४ वाईट दशा. १०॥ हाय हाय. ८ घरीं. १४-१५ खर नामक तिचा भाऊ त्यास.

१ ११ २
जनस्थानवासी खर क्रूरकर्मा ॥
५ ६ ४ ३ ९ ८ ७
न पाहे नया जो विचारी न शर्मा ॥
१२ १४ १० १५ १३
स्वसैन्यासि आज्ञा कुधी दे वधाया ॥
१६ २० २१ १७ १८ १९
प्रभू सिद्ध झाले यशें देव धाया ॥ ३५ ॥

अर्थ—नासिकास राहणारा, क्रूर कर्म करणारा, न्याय न पाहणारा न सुखाकडे लक्ष न देणारा असा जो दुष्टबुद्धि खर, त्यानें आपल्या सैन्यास प्रभू रामचंद्राचा वध करण्याची आज्ञा दिली; व इकडे प्रभूही, यशाच्या योगानें देवांची तृप्ति करण्याकरितां, युद्धास सिद्ध झाले.

टीप—१जनस्थान म्ह० नासिक येथें, वासी म्ह० राहणारा २ दुष्ट कर्म करणारा ४ न्याय ७ सुखातें १०दुष्टबुद्धि १३ मारण्यास १९ तृप्तकरण्यास.

५ ३ ६ २ ४
प्रेमें लक्ष्मणजींस सांगति रणारंभींच सद्रक्षण ॥
१ १२ ११ ७ ९ ८ १०
स्वामी लाविति न द्विषद्दलवधें व्हावयासि भक्षण ॥

१४ १५ १३ १६ १७ १८ १९
हे तार्क्ष्य प्रभु ते चतुर्दशसहस्त्र क्रव्यभोक्ते अही ॥
२० २३ २२ २१ २६ २५ २४
बाई देखिलिं दूरुनीहि रुधिरें धाली निवाली मही ॥३६॥

**अर्थ**—स्वामीनीं (रामचंद्रानीं) युद्धाचे आरंभींच लक्ष्मणजीस माझें रक्षण करावें ह्मणून मोठया प्रेमानें सांगितलें; व त्यांनीं (रामचंद्रानीं) शत्रूचें सैन्य मारून आपलें कल्याण करण्यास एक क्षण देखील लाविला नाहीं. (त्या युद्धाच्या वेळेस असें वाटलें कीं,) प्रभु (रामचंद्र) हे गरूड आणि ते चवदाहजार मांसभक्षक (राक्षस) सर्प. हे बाई सखे, तें रक्त वाहिलेलें मी दुरून पाहिलें व तेणेंकरून पृथ्वीचें शांतवन झालें आणि ती तृप्तही झाली.

**टीप**—२युद्धाच्या आरंभीं ४मतु म्ह० माझें रक्षण ७ द्विषत म्ह० शत्रु याचें बळ म्ह० सैन्य याच्या, वधें म्ह० मारण्यानें १५. गरुड १७ चवदा हजार १८ क्रव्य ह्म० मांस याचे भोक्ते ह्म० खाणारे असे राक्षस १९ सर्प २१ रक्तें २५. शांत झाली २६ तृप्त झाली. २४ पृथ्वी.

६ १ ५ ७
स्वमुख अवदसा तसेंहि दावी ॥
३ ४ २ ८ ९
न धरुनि लाज कलागतीस लावी ॥
१३ १२ १० ११
प्रकटुनि बळ पुष्कराक्ष साचें ॥
१८ १४ १६ १७ १५
करिति भयें मुख शुष्क राक्षसांचें ॥ ३७ ॥

**अर्थ**—ती राक्षसी आपलें मुख, लज्जा न धरितां तसेंच (नाक कापलेलें) दाखवून कलह उत्पन्न करिती झाली. इकडे रामानें आपलें खरोखर बळ दाखवून त्या राक्षसांचीं मुखें भयानें सुकवून टाकिलीं.

**टीप**—१ राक्षसी–शूर्पणखा. ८ कलहास. १० पुष्कर ह्म० कमलासारिखे आहेत अक्ष म्ह० डोळे ज्याचे, असे राम. १७ म्लान.

६ ७ ८ १ ३
माया-सुवर्णमृग राक्षस त्या खळानें ॥
४ २ ६ ५ २
जो धाडिला परमरम्य विशृंखळानें ।

तो वाटला निरखितां मजला धरावा ॥
त्याचा पुरा स्वजन सर्व सुखी करावा ॥ ३८ ॥

अर्थ—त्या उन्मत्त दुष्टानें (रावणानें) कपटरूपें एका राक्षसास (मारीच मामास) अतिसुंदर अशा एका सुवर्णाच्या मृगाचें रूप देऊन पाठिविलें. (सीता म्हणते) तो पाहतांच मला असें वाटलें कीं त्याला धरावें आणि आपल्या शहरीं (अयोध्येस) नेऊन आपल्या आप्तांस आनंदी करावें.

टीप—२ उन्मत्त—अज्ञानें. ६,७ मायावी सोन्याचा हरिण. १५ शहरीं.

द्या म्हणें सुरुचिरा हरिणा मीं ॥
बाइ दृष्टि न दिली परिणामीं ॥
सोडिली निपट भीड सतीहो ॥
आग्रहें तिपट भी उसती हो ॥ ३९ ॥

अर्थ—मीं रामचंद्रास म्हटलें कीं, "मला तो सुंदर हरिण द्या." बाई, त्यावेळेस मी यापासून परिणाम काय होईल यावर कांहीं एक नजर दिली नाहीं आणि हे पतिव्रतांनो, मीं अगदीं लाज सोडून दिली, आणि हरिण धरण्याविषयीं आग्रह धरिला त्या आग्रहामुळें तिप्पट भय उत्पन्न झालें.

टीप—३ फार सुंदर १५ हट्टानें. १७ भय, संकट. १८,१९ उत्पन्न झालें.

देऊनि चाप भातें, वदल्यें लांबेल मृग धरा जाच ॥
ठेवुनि लक्ष्मणजींतें, गेले स्त्रीचा नव्हे बरा जाच ॥४०॥

अर्थ—धनुष्य भातें देऊन मीं ह्मटलें, "अहो तो हरिण लांबेल जाच धरा." नंतर स्वामी लक्ष्मणजीस आश्रमांत ठेवून गेले (त्यानंतर कवि म्हणतो) स्त्रीचा जाच चांगला नाहीं.

टीप—१३ त्रास. १५ हरिण.

पळे मृग कळे छळ प्रभु तया शरें ताडिती ॥
हरूनि असु काननीं आरसि बाइ हो पाडिती ॥

**तशांत खळ हाक दे प्रभुवरस्वरा सारखी ॥**
**खरेंचि ह्मणती श्रुती मनहि जें बरें पारखी ॥४१॥**

**अर्थ**—तो हरिण पळावयास लागला तेव्हां (रामचंद्र) प्रभूस कपट आहे असें वाटलें; अहो बाई, मग त्यांनीं त्या शत्रूस बाण मारून, त्याचे प्राण हरण करून त्यास त्या वनामध्यें पाडिलें. इतक्यांत त्या दुष्ट राक्षसानें स्वामींच्या शब्दासारिखी हाक मारिली; हा शब्द रामचंद्राचाच आहे खरा, असें जें चांगली पारख करणारे मन व कान तेही म्हणूं लागले. (म्ह० त्यांसही वाटलें.)

**टीप**—३ कपट. ९ बाणानें. ११ प्राण. १३ शत्रूस. १४ अरण्यांत १८,१९ प्रभु रामचंद्राच्या शब्दासारिखी. २४ पारख करणारे. २५ कान.

**"हा सीते हा लक्ष्मणा" यापरीची ॥ दीना वाणी ऐकिली म्यां अरीची।**
**बाई हो ती मद्विचारासि मोडी ॥ धैर्या सोडी शोक चित्तांत जोडी ॥४२॥**

**अर्थ**—"हा सीते हा लक्ष्मणा" या प्रकारचे मीं त्या शत्रूचे करुणापर शब्द ऐकले. बाई हो, त्या हकेच्या योगानें माझा विचार गेला, धैर्य गळलें आणि मनांत शोक मात्र उत्पन्न झाला.

**टीप**—३ याप्रकारची. ६ गरिबीची. ५ शत्रूची. १२ मत् म्ह. माझ्या विचारास १६ मनांत.

**वदल्यें मी लक्ष्मणजी, स्वाम्यसुसंरक्षणार्थ धांवा हो ॥**
**धांवा, हा विपदोघीं, म्हणतां सर्वस्व भव्य कां वाहो ॥ ४३ ॥**

**अर्थ**—मी बोललें, "अहो लक्ष्मणजी स्वामीचे प्राणसंरक्षणाकारितां धांवा हो धांवा" "अहो विपत्तीच्या प्रवाहांत आपलें सर्वस्व कल्याण वाहो असें कां ह्मणतां" (ह्मणजे राम गेल्यावर आपलें कल्याण वाहवलेंच कीं नाहीं.)

**टीप**—४ स्वामी म्ह० रामचंद्र यांचे. असु म्ह० प्राण, याचे संरक्षणार्थ. विपत् म्ह० दुःख याचे ओघीं म्ह० प्रवाहांत, ११ कल्याण. १२ वाहत जावो.

तों भावोजी वदले, आहे हें स्पष्ट राक्षसछद्म ॥
पद्मछदाक्ष आहे, विजयश्री-नित्य-केलिचें सद्म ॥ ४४ ॥

**अर्थ**—इतक्यांत भावोजी (लक्ष्मणजी) ह्मणाले हें उघड राक्षसाचें कपट आहे. कमल नेत्र जो रामचंद्र, तो विजयलक्ष्मीचें नित्य क्रीडा करण्याचें गृह आहे. (त्याला अपजय येईल कसा?)

**टीप**—६ राक्षसाचें कपट. ९ विजयलक्ष्मीचें. १० नेहमींचें. ११ क्रीडेचें. १२ गृह, स्थान. ८ पद्म म्ह० कमळ, छद म्ह० पाकळी, अक्ष म्ह० डोळे—कमळाच्या पाकळ्यासारखे आहेत डोळे ज्याचे असा—रामचंद्रजी.

गमलें लक्ष्मणजींचें, वच कटु मधुरहि असत्य सत्यहि तें ॥
त्यांतें वदलें वचनें, हृदय विदारावयासि अत्यहितें ॥ ४५ ॥

**अर्थ**—लक्ष्मणजींचें बोलणें जरी गोड आणि खरें होतें तरी तें कडू व खोटें असें वाटलें. यास्तव त्यांचें हृदय फुटावें अशीं अत्यंत नाशकारक भाषणें मी त्यांस बोललें.

**टीप**—२ भाषण. ६ कडू. १० फोडण्यास. १२ अति + अहितें म्ह० अत्यंत नाशकारक. ११ लक्ष्मणाला.

वर्तें मदभिलाष मनांत ॥ तूं तरिच शिरलास वनांत ॥
जींत उग्रतरता असिवाणी ॥ मन्मुखांतुनि निघे असि वाणी ॥४६ ॥

**अर्थ**—(सीता म्हणाली) "तुझ्यामनांत माझा अभिलाष वागत आहे यास्तवच तूं आमचे बरोबर अरण्यवासास निघालास." अहो जींत तरवारी प्रमाणें तीक्ष्णता अशी माझ्या मुखांतून वाणी निघाली.

**टीप**—१ मत् + अभिलाष म्ह. माझा अभिलाष. १०तीक्ष्णता. ९ असि म्ह० तरवार, वाणी ह्म. प्रमाणें. १२ भाषण. १३ मत् + मुखांतुनि ह्म. माझ्या मुखांतून.

क्रोधें केलें छिन्न प्रेम हृदय दुष्टवाक्शरें भिन्न ॥
त्रासें झाले खिन्नस्वांत महासाधु कंपित खिन्न ॥ ४७ ॥

अर्थ—रागानें (लक्ष्मणभावोजींच्या) मनांतील प्रेम नाहींसे केलें, व दुष्ट वाक् बाणानें त्यांचें हृदय फोडलें. महा साधु (लक्ष्मण) त्याचें अंतःकरण ह्या त्रासानें खेदयुक्त झालें व तो कांपू लागून घामानें त्याचें आंग भिजलें.

टीप—३।७नाहींसे केलें. ४ दुष्ट भाषण हेंच कोणी बाण त्या बाणानें. १० खेदयुक्त अंतःकरण झालेला. १२ घामानें भिजलेला.

५ १ ४ ३ २ ६ ७ ८
गेले लक्ष्मणजी त्यजूनि उटजा जों तोंचि ओका यती ॥
९ ११ १० १६ १५ १३ १४ १२ १९ १७
तैसा ये दशकंठ दाखवि तनू जी उग्र तो काय ती ॥
२० १८ २ २६ २७ २३ २४ २२ २५
सांगावी भयदा तरी न वदल्यें पावोनि मी कांप हा ॥
३१ ३२ ३४ ३५ ३३ २९ ३० ३६ २८
मंदावो परि तेज सोडिल निज ज्वाला हिमीं कां पहा ॥ ४८ ॥

अर्थ—लक्ष्मणजी जों आश्रम सोडून गेले तोंच घरीं जसा संन्यासी येतो तसा रावण आला व त्यानें आपलें भयंकर शरीर दाखाविलें. त्या भयंकर शरीराचें वर्णन तरी काय करावें? तें शरीर पाहून जरी माझ्या आंगास कांपरें सुटलें तरी मीं (संकट सूचक) हाय हाय असा शब्द केला नाहीं. (यावर कवि म्हणतो) थंडींत (अग्नीची) ज्वाळा जरी मंदावली तरी ती आपलें तेज सोडील काय? तशी सीता जरी भ्याली तरी तिचें धैर्य सुटलें होतें काय? नाहीं.

टीप—३ पर्णकुटिका. ७ घरीं. ८ बैरागी. सन्यासी. १० रावण. १५ शरीर. १९ प्र. सर्वनाम. २५ हाय हाय. १८ भयप्रद. 31 कमी होवो. २९ आग्नि 30 थंडींत.

६ ४ ५ ३ २
लंघुनि बहुनगगहनें, जलनिधि सोडूनि मरणशंकेला ॥
११ १ १२ १० ९ ७ ८
लंकेला खल गेला, वेगें घेउनि मला विपंकेला ॥ ४९ ॥

अर्थ—मरणाची शंका न धरितां पुष्कळ पर्वत, वनें, समुद्र ओलांडून निष्पाप अशी जी मी त्या मला घेऊन तो दुष्ट (रावण) त्वरेनें लंकेला गेला.

**टीप**—४नग ह्म० पर्वत, गहनें ह्म० अरण्यें. ५ समुद्र ८ वि ह्म० नाहीं, पंक म्ह० पाप जीस अशीला-

**स्वामींचा मज नकळे, माझा स्वामींसही समाचार ॥**
**सोसित होतें सत्वें, अहितांचें मी महीसमा चार ॥ ५० ॥**

**अर्थ**—स्वामींचा (रामचंद्राचा) समाचार मला व माझा स्वामींला कांहीं कळत नसे, त्या वेळेस ह्या शत्रूंच्या चेष्टा मी मोठया धैर्यानें पृथ्वी प्रमाणें सोसीत होतें.(ह्मणजे पृथ्वीवर कांहीं जरी केलें तरी ती जसी कांहीं बोलत नाहीं त्याप्रमाणें हीही पृथ्वीची कन्याच होती म्हणून हिनें सर्व सहन केलें)

**टीप**—११ धैर्यानें. ९ शत्रूचे. १०चेष्टा.

**सुज्ञाना सरमा बिभीषणवधू विद्याचि माना कळा ॥**
**तत्कन्या त्रिजटाहि रंजवि जशी गानाभिधाना कळा ॥**
**चिंतीं लक्ष्मणजीसमेत सतत स्वामींस मी चातकी ॥**
**जैशी जीवनदासि बाइ तिळही तो न द्रवे पातकी ॥ ५१ ॥**

**अर्थ**—उत्तम ज्ञानी जी सरमा बिभीषणाची बायको, जिला मूर्तिमंत विद्या मानावी व तिची कन्या त्रिजटा, कळाच मानावी. जसी लोकांस गायनकळा रंजविते, तशी ती (त्रिजटा) मला रंजवीत असे; तथापि चातक पक्षीण जशी मेघाकडे लक्ष लावून बसते तशी मी नेहमीं लक्ष्मणभावोजी सह स्वामींचें चिंतन करीत असें; परंतु बाई ह्या पातक्याला (रावणाला) तिळमात्र दया आली नाहीं.

**टीप**—१उत्तम ज्ञानी, २ बिभिषणाच्या बायकोचें नांव. ३ बिभीषण + वधू ह्म० बायको. ५समजा. ११ गान + अभिधाना ह्म० गायन नामक. १४ चातक पक्षीण, १५मेघास.

**मामाजींचे शतमख सखे धाडिती अन्नपात्र ॥**
**स्वामींतें मी स्मरत कवळी तात्प्रिया ग्रासमात्र ॥**

[१५]केलें [१४]देहावन [१२]मुनिसतीनिर्मितें [१३]अंगरागें ॥
[२२]चिंती [१६]चित्त [१८]प्रभुजय [१७]सदा [२०]शत्रुचा [२१]भंग [१९]रागें ॥ ९२ ॥

**अर्थ**——मामाजींचें स्नेही जे देवेंद्र, ते मला अन्नाचें ताट पाठवीत असत; आणि मी त्यांच्या (इंद्राच्या) प्रीतीस्तव स्वामींचें स्मरण करून एखादा घास मात्र खात असे. अनुसूयेनें जी मला उटी लाविली होती त्यायोगें माझ्या शरीराचें संरक्षण झालें; आणि प्रभूचा (रामचंद्राचा) सदा जय होवो आणि रागानें शत्रूचा (रावणाचा) नाश होवो असें मनांत चिंतीत असे.

**टीप**——१ दशरथाचे. ३ शत म्ह० शंभर केले आहेत, मख म्ह० यज्ञ ज्यानें—इंद्र. ११ घेत असे. ७ तत् ह्म० त्याच्या (इंद्राच्या) प्रिया म्ह० प्रीतीस्तव. १० घास मात्र. १४ देह ह्म० शरीर याचें, अवन ह्म० संरक्षण. १२ ऋषिची बायको अनुसूया हिनें उत्पन्न केलेली. १३ उटीनें. २० रावणाचा. २१ नाश.

---

विराटपर्वांतील.

# उत्तरगोग्रहण प्रकरण.

पूर्वी हस्तनापुरांत (दिल्लींत) पंडु राजा राज्य करीत होता. त्यास धर्म, भीम, अर्जुन, नकुळ आणि सहदेव असे पांच पुत्र होते. त्यास पांडव ह्मणतात. त्या राजास धृतराष्ट्र ह्मणून एक भाऊ होता. त्यास एकशेंएक पुत्र होते. त्यास कौरव ह्मणतात कौरव व पांडव हे एका गुरुपाशीं विद्याभ्यास करीत असत. तो गुरु पांडवांची विद्या पाहून फार खुश होत असे. हें धृतराष्ट्रपुत्रांस सहन न झाल्यामुळें धृतराष्ट्रानें असा विचार केला कीं, हें राज्य पांडव आपल्या पुत्रांस कधींही पचूं देणार नाहींत. याकरितां आपल्या देखतच यां-

चा तंटा मिटवावा, ह्मणून त्यानें पांडवांस राहण्याकरितां "इंद्रप्रस्थ" नांवाचें एक खेडेगांव होतें, तें दिलें.

कांहीं दिवस लोटल्यावर धर्मराजानें राजसूय यज्ञ आरंभिला त्यावेळीं सर्व पृथ्वी जिंकून अतिशयित संपत्ति आणिली. त्या यज्ञांत मयासुर नामें दैत्यानें एक अप्रतिम सभागृह बांधून दिलें होतें कारण ज्यावेळेस खांडववन अर्जुनानें अग्नीस दिलें; त्यावेळेस ह्या दैत्याची आई व हा त्या वनांत राहत असे तेव्हां त्यास त्या संकटापासून वांचविलें होतें. तो उपकार स्मरून त्या दैत्यानें हें सभागृह तयार केलें होतें- त्या ठिकाणीं अशी विलक्षण जमिनीची रचना केली होती कीं, जेथें जमीन असे तेथें पाणी दिसावें व पाणी असे तेथें जमीन दिसावी, हा चमत्कार पाहण्या करितां कौरवप्रमुख दुर्योधन त्या सभागृहांत गेला. दुर्योधनास हा चमत्कार न कळून तो जमिनीवर ह्मणून बसावयास गेला तों पाण्यांत पडून त्याचीं सर्व वस्त्रें भिजलीं. हें कृत्य द्रौपदीनें माडीवरून पाहिलें. तेव्हां तीस हसूं आलें व भीम त्यास असें म्हणाला कीं, "अरे धृतराष्ट्राच्या पोरा हें पाणी आहे.' (धृतराष्ट्र आंधळा होता. ) हें बोलणें व द्रौपदीचें हंसे दुर्योधनास न सहन होऊन आपल्या शकुनी मामाकडून धर्माशीं कपटद्यूत खेळवून त्याची सर्व संपत्ति हरण केली. शेवटीं ह्या पांच भावांस व द्रौपदीसही जिंकलें. नंतर त्यांच्या बायकोची ( द्रौपदीची ) विटंबना करण्या करितां आपल्या दुःशासन नामें भावाकडून ती रजस्वला असतां केश धरून फरफरा ओढीत सभेंत आणविली, परंतु श्रीकृष्णानें तिची लज्जा रक्षण केली. शेवटीं त्यांनीं असा पण केला कीं, जो द्यूतांत हरेल त्याणें बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावा अज्ञांत वासांत पांडव कोठें आहेत हें समजल्यास पुन्हा बारा वर्षें वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास भोगावा.

पांडव पणांत हरल्यावर वनवास भोगून अज्ञातवासा करितां निरनिराळीं रूपें धारण करून विराटाच्या घरीं गेले.

पांडव विराटाच्या घरीं आहेत कीं नाहींत याचा पत्ता लागण्या करितां कौरव प्रमुख दुर्योधनानें विराटाच्या गाई हरण कराव्या असें मनांत आणिलें व त्या प्रमाणें दक्षिणेस आपण गेला आणि उत्तरेस इतर योद्धे पाठवि-

ले. दक्षिणेस दुर्योधनाशीं लढण्याकरितां विराट व अर्जुनावांचून सर्व पांडव गेले होते, आणि उत्तरेस विराटाचा मुलगा उत्तर आणि अर्जुन असे दोघे गेले होते. ही कथा पुढील भागांत आहे—

## आर्या.

मत्स्यपुरोत्तरभागीं, प्रातःकाळींच ये सुयोधन हो॥
ज्यासि जयप्राप्ति मनीं ह्मणती भीष्मादिही सुयोध न हो॥

**अर्थ**—अहो, दुर्योधन राजा विराटाच्या धेनुहरण करण्याकरितां विराटनगराच्या उत्तर दिशेस प्रातःकाळींच आला. त्यावेळेस भीष्मादिकरून मोठमोठे योद्धे "त्याला (दुर्योधनाला) जय मिळूं नये" असें आपल्या मनांत म्हणूं लागले.

**टीप**—२. वाईच्या उत्तर भागीं ४. दुर्योधन ७. चांगले योद्धे.

सहसा व्रजांत गांठुनि, बहुताडुनि, करुनि बद्धभुज, गवळी॥
षष्टिसहस्र सुगोधन तो कुरुकुळचंदनद्रु भुजग वळी॥२॥

**अर्थ**—कौरववंश हाच कोणी चंदनाचा वृक्ष त्यावरील सर्प जो दुर्योधन राजा, त्यानें विराटाच्या गवळ्यास एकाएकीं गोठ्यामध्यें गांठिलें, त्यांस पुष्कळ मार दिला, त्यांच्या मुसक्या बांधल्या, आणि तो साठ हजार गाई हांकून नेऊं लागला

**टीप**—२. एकाएकीं. ३ गोठ्यांत. ६ मुसक्या. ११ साठ हजार. १२ सु + गो + धन ह्म० चांगल्या गायी हेंच कोणी धन. ९ कुरुकुळ + चंदन + अद्रु म्ह० कौरववंश हेंच कोणी चंदनाचें झाड त्यावरील. १० सर्प — दुर्योधन.

गोपाध्यक्ष रथावरि, बैसुनि धांवे नृपासि सांगाया॥
चित्तीं ह्मणे बुडाया, कुर्वधमा हरिसि धेनु कां गा या॥३॥

**अर्थ**—त्या गवळ्यांचा नाईक हें वर्तमान विराटराजास सांगण्या करितां आपल्या रथावर बसून धांवत गेला, आणि आपले मनांत म्हणूं लाग.

ला कीं, हे दुर्योधना, आपला नाश करून घेण्यास कां ह्या गाई हांकून नेत आहेस?

**टीप**—१. गोप ह्म० गाई राखणारे (गवळी) † अध्यक्ष म्ह० मुख्य. १० कुरु म्ह० कौरव यांत, अधम म्ह० नीच असा दुर्योधन.

**तो राजगृहीं जाउनि, रायाच्या उत्तराख्य तनयातें॥**
**नमुनि ह्मणे हो नेता, दुर्योधन धेनु करुनि अनयातें॥४॥**

**अर्थ**—तो (नाईक) राजवाडयांत गेला आणि विराट राजाच्या उत्तर नांवाच्या पुत्रास नमस्कार करून सांगूं लागला कीं, अहो महाराज, दुर्योधन राजा अन्याय करून आपल्या गाई घेऊन चालला आहे.

**टीप**—५ उत्तर आहे आख्य ह्म० नांव ज्याचें. ६ पुत्राला.

**उत्तर ह्मणे असे जरि, मी एकाकी लहान परि सवतें ॥**
**यश जोडितोंचि असता, सारथि तरि कथन मज न परिसवतें॥५॥**

**अर्थ**—उत्तर ह्मणाला, मला जर सारथी असता तर, मी एकटा आणि लहान आहें तथापि निराळी कीर्ति मिळविली असती; आणि हें वर्तमानही मला ऐकवलें नसतें.

**टीप**—९ निराळें. ४ एकटा. १६ वर्तमान. १७,१८ ऐकवतेंना.

**मिळवा कोणीतरि हो, धैर्याचा मात्र उदधि सारथि जो ॥**
**कुरुभटसमूह पाहुनि, मज जेंवि हिमास सुदधि–सार थिजो॥६॥**

**अर्थ**— अहो, जो धैर्याचा केवळ समुद्र असा कोणी तरी सारथी मिळवून आणा. (ह्या सारथ्याच्या योगानें) ज्याप्रमाणें तूप थंडीच्या योगानें थिजतें त्याप्रमाणें मला पाहून कौरव सैन्यांतलि योध्यांच्या समुदायानें थिजावें.

**टीप**—५ समुद्र. १५ कुरु म्ह० कौरव, † भट ह्म० योद्धे, यांचा समुदाय. ११, १२ चांगल्या दह्याचें सार —तूप.

**उत्तर म्हणे कुरुकटक, न पशूंस यशासहि स्वसे नेतें ॥**
**अवकाश पळहि नाहीं, कळवाया वृत्त हें स्वसेनेतें ॥ ७ ॥**

**अर्थ**—उत्तर ह्मणाला, अगे बहिणी, कौरवसैन्य केवळ आपल्या गाईंच हरण करून नेतें असें नाहीं, तर आपली कीर्तिही हरण करून नेत आहे; यास्तव हें वर्तमान आपल्या सैन्यास कळविण्यास एक पळभर देखील विलंब नाहीं.

**टीप**—३ हे बहिणी. ४ कुरु + कटक ह्म० कौरव सैन्य. १० वर्तमान. ११ स्व म्ह० आपल्या, सेनेतें म्ह० सैन्यास—आपल्या सैन्यास.

**माझें सारथ्य करू, तुझिया वचनें बृहन्नडा गमला ॥**
**हाचि सदुपाय वत्से, लागो अपकीर्तिचा न डाग मला ॥ ८ ॥**

**अर्थ**—(उत्तर म्हणतो) हे बहिणी, तुझ्या सांगण्यावरून बृहन्नडेनें माझें सारथ्य करावें, हाच मला चांगला उपाय वाटतो, आणि मला (तिच्या योगानें) दुष्कीर्तीचा डागही लागणार नाहीं.

**टीप**—१ हे मुली बहिणी. ४ अज्ञात वासाच्या वेळेस अर्जुनानें स्त्रीवेष धारण केला होता त्यावेळचें नांव. ९ सत् + उपाय म्ह० चांगला उपाय. १३ कलंक दूषण.

**ती धांवत जाय म्हणे, गानादिक हें बृहन्नडे राहो ॥**
**समयीं सारथ्यगुणा, नुघडूनी कदर्युचा न डेरा हो ॥ ९ ॥**

**अर्थ**—ती उत्तरा (नृत्यशाळेंत) धांवत गेली आणि ह्मणाली, बृहन्नडे, गाणें, नाचणें इत्यादि राहूंदे, आणि ह्या वेळेस, तुझ्या आंगीं जो सारथ्य करण्याचा गुण आहे तो न प्रगट करून कृपणाच्या डेऱ्याप्रमाणें होऊं नको. म्हणजे कृपणाच्या जिवावर जरी एखादा कठीण प्रसंग येऊन गुदरला तरी आपलें संचय करून घागरींत पुरून ठेविलेले द्रव्यापैकीं एक कवडी देखील खर्च करीत नाहीं, त्याप्रमाणें आपला गुण गुप्त ठेवूं नको, प्रगट कर.

**कुरुकटकासि पहातां, तो उत्तरबाळ फार गडबडला ॥**
**स्वपरबळाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥ १३ ॥**

**अर्थ**—तो उत्तर मुलगा कौरवसैन्य पाहिल्याबरोबर फार घाबरला. पूर्वी त्या मूर्खानें (उत्तरानें) आपली व दुसऱ्याची शक्तता अशक्तता कितपत आहे ह्याचा विचार न करितां विनाकारण बायकांमध्यें फार बडबड मात्र केली.

**टीप**—६ घाबरला. ७ मूर्ख. ८ स्व म्ह० आपलें, पर म्ह० दुसऱ्याचें, बळ म्ह० सामर्थ्य, अबळ म्ह० गैरसामर्थ्य. ९ न जाणून.

**बोले "बृहनडे, हें कुरुबळ कल्पांतसिंधुसंगमतें ॥**
**न रथ पुरांत माझें मन नयनहि पाहतां बहू भ्रमतें" ॥ १४ ॥**

**अर्थ**—(उत्तर घाबरला आणि बृहन्नडेस) ह्मणूं लागला कीं, "हे बृहन्नडे हें कौरवसैन्य मला तर प्रलयकाळच्या समुद्राप्रमाणें भासतें आहे. हें पाहतांच माझे डोळे फिरूं लागतात आणि मनाला भयाचा धक्का बसतो; यास्तव रथ शहरांत लवकर घेऊन चल."

**टीप**—४ कौरवसैन्य. ५ प्रळय काळच्या समुद्राप्रमाणें. ६ भासतें. १० नेत्र. १२ फिरतात.

**पार्थ म्हणे राजसुता, आतां वदतोस? हें अहा! काय ॥**
**शय्येवर न पडाया योग्य रणक्षितिवरीच हा काय ॥ १५ ॥**

**अर्थ**—बृहन्नडा (अर्जुन) उत्तरास ह्मणाला "हे राजपुत्रा उत्तरा, अहाहा!! तूं घरीं मोठमोठया वल्गना केल्या, आणि आतां हें (वरच्या आर्येंत लिहिल्याप्रमाणें) असें काय म्हणतो आहेस? तूं क्षात्रिय आहेस याकरितां तुला रणांगणांत पडून मरणें हेंच योग्य आहे, घरीं अंथरुणावर पडून मरणें योग्य नाहीं.

**टीप**—१ अर्जुन. ३ राजपुत्रा. ११ अंथरूणावर. १५ रणभूमीवर. १० शरीर. शरीर.

**कुरुकटकासि पहातां, तो उत्तरबाळ फार गडबडला ॥**
**स्वपरबळाबळ नेणुनि बालिश बहु वायकांत बडबडला ॥१३॥**

**अर्थ**--तो उत्तर मुलगा कौरवसैन्य पाहिल्याबरोबर फार घाबरला. पूर्वी त्या मूर्खानें (उत्तरानें) आपली व दुसऱ्याची शक्तता अशक्तता कितपत आहे ह्याचा विचार न करितां विनाकारण बायकांमध्यें फार बडबड मात्र केली.

**टीप**--६ घाबरला. ७ मूर्ख. ८ स्व म्ह० आपलें, पर म्ह० दुसऱ्याचें, बळ म्ह० सामर्थ्य, अबळ म्ह० गैरसामर्थ्य. ९ न जाणून.

**बोले "बृहनडे, हें कुरुबळ कल्पांतसिंधुसेंगमतें ॥**
**न रथ पुरांत माझें मन नयनहि पाहतां बहू भ्रमते" ॥ १४ ॥**

**अर्थ**--(उत्तर घाबरला आणि बृहन्नडेस) ह्मणूं लागला कीं, "हे बृहन्नडे हें कौरवसैन्य मला तर प्रलयकाळच्या समुद्राप्रमाणें भासतें आहे. हें पाहतांच माझे डोळे फिरूं लागतात आणि मनाला भयाचा धक्का बसतो; यास्तव रथ शहरांत लवकर घेऊन चल."

**टीप**--४ कौरवसैन्य. ५ प्रळय काळच्या समुद्राप्रमाणें. ६ भासतें. १० नेत्र. १२ फिरतात.

**पार्थ म्हणे राजसुता, आतां वदतोस? हें अहा! काय ॥**
**शय्येवर न पडाया योग्य रणाक्षितिवरीच हा काय ॥ १५ ॥**

**अर्थ**--बृहन्नडा (अर्जुन) उत्तरास ह्मणाला "हे राजपुत्रा उत्तरा, अहाहा!! तूं घरीं मोठमोठ्या वल्गना केल्या, आणि आतां हें (वरच्या आर्येंत लिहिल्याप्रमाणें) असें काय म्हणतो आहेस? तूं क्षात्रिय आहेस याकरितां तुला रणांगणांत पडून मरणें हेंच योग्य आहे, घरीं अंथरुणावर पडून मरणें योग्य नाहीं.

**टीप**--१ अर्जुन. ३ राजपुत्रा. ११ अंथरुणावर. १५ रणभूमीवर. १० शरीर. शरीर.

१ २ ३ ४ ५ ६ ७ ८
तेव्हां स्त्रियांत तैसें बोलूनि, आतां असें कसें वदसी ॥
१० ११ १२ १३ १६ ९ १५ १४
एकहि बाण न सुटला नाहीं अद्यापि झळकला सदसी ॥१६॥

**अर्थ**—"रे उत्तरा, तूं घरीं बायकांत (५, ६, ७, ८, या आर्यांत सांगितलें आहे) त्या प्रमाणें बोललास, आणि आतां हें (१५ व्या आर्येंत सांगितल्या प्रमाणें) असें काय भाषण करितोस? अजून पावेतों एक देखील बाण सुटला नाहीं किंवा एकही तरवार झळकली नाहीं. इतक्यांतच "तूं भिऊं लागलास?"

**टीप**—१४ तरवार, खड्ग

२ १ ३ ४ ७ ६ ५ ८
ऐसें पार्थ वदे तों भिउनि कटकबागुलासि पोर पळे ॥
११ ९ १० १२
शत्रुप्रतापदावज्वालांनीं तो कुरंग होरपळे ॥ १७ ॥

**अर्थ**—अर्जुन वरच्या आर्येंत लिहिल्याप्रमाणें उत्तरास बोलतो आहे इतक्यांत एखादें मूल बागूल बोवाला भिऊन जसें पळतें त्या प्रमाणें तो उत्तर सैन्यरूप बागुलास भिऊन पळूं लागला, आणि एखादा हरिण वणवा लागला असतां त्याच्या ज्वालांनीं तो जसा भाजतो त्या प्रमाणें तो उत्तर शत्रूंचें सामर्थ्य हाच कोणी वणवा त्याच्या ज्वालांनीं भाजूं लागला.

**टीप**—६ सैन्यरूपी बाऊ १० हरिण ११ शत्रूंचा प्रताप म्ह० सामर्थ्य हाच कोणी दाव म्ह० वणवा त्याच्या ज्वालांनीं.

१ २ ३ ४ ७ ५ ८ ६
कुरवाळोनि म्हणे, गा, राजसुता योग्य तूं न कांपाला॥
९ १० ११ १४ १३ १२
मृदुलत्व म्लानत्व स्वीकारुनि जाहलासि! कां पाला ॥ १८ ॥

**अर्थ**—अर्जुन गोंजारून ह्मणूं लागला कीं, हे राजपुत्रा (उत्तरा) तूं आपल्या आंगीं कंप धारण करण्यास योग्य नाहींस; असें असून तूं आपल्या आंगीं मृदुलत्व, म्लानत्व धारण करून झाडाच्या पाल्याप्रमाणें कां झाला आहेस? (ह्म० असा कां कोमेजला आहेस.)

**टीप**—१ गोंजारून. ६ भिऊन कांपूं लागण्यास. १० कोमेजणें. ९ मऊपणा.

१ २ ३ ४ १० ७ ६ ५ ९ ८
**तुज उत्साह नसे तरि करितों घेउन धनूस मी रण हो ॥**
११ १२ १४ १३ १७ १५ १६ १८
**मज मेघासि कराया शरवृष्टि सहाय तूं समीरण हो ॥ १९ ॥**

**अर्थ**—(अर्जुन उत्तरास म्हणतो) "तुला युद्ध करण्याविषयीं उत्साह नसला तर कांहीं चिंता नाहीं; मी धनुर्बाण घेऊन युद्ध करितों. परंतु मी जो मेघ त्या मला मेघाला बाणांची वृष्टि करण्यास तूं जो वारा तो सहाय हो (म्ह० माझें सारथ्य कर.)

**टीप**—९ युद्ध १३ बाणांचा वर्षाव १६ वारा.

४ ३ १ २ ८ ५ ६ ९ ७
**बैस रथीं तूं माझ्या सारथि हो तरणिचा जसा अरुण ॥**
१७ १६ १४ १५ १३ १० ११ १२
**न्यावा चमूवरि तुवां, रथ तरुणीप्रति जसा स्मरें तरुण ॥२०॥**

**अर्थ**—(अर्जुन म्हणाला) "तूं माझ्या रथीं बसून, जसा सूर्याचा अरुण सारथी आहे तसा माझा सारथी हो; आणि मदन जसा तरुण पुरुषास तरुण स्त्रीकडे जलद नेतो तसा तूं माझा रथ सैन्यावर ने."

**टीप**—६ सूर्याचा ११ मदनानें १६ सैन्यावर.

१ ३ २ ४ ५ ६ ७ ८
**आतां सोडवितों पशु, खळबळ पळ न लागतांचि पळवीतों ॥**
९ १० ११ १२ १३ १४ १५ १६
**मी विजय असें तुजाचि न सकळांही कौरवांसि कळवीतों ॥२१॥**

**अर्थ**—आतां गाई सोडवितों आणि दुष्टाचें सैन्य एक पळ न लागतां पळवून लावितों. मी विजय (अर्जुन) आहें असें तुलाच नाहीं परंतु सर्व कौरवांसही कळावितों.

**टीप**—२ गाई १० अर्जुन दु॰ अ॰ जिंकणारा.

२ १ ६ ३ ४ ५
**जातां कुरुकटकावरि वाजविला दिव्य देवदत्त दर ॥**
६ १२ ११ ७ ८ ९ १०
**तो होय जना जैसा कल्पांतीं रुद्रदेव दत्तदर ॥२२॥**

**अर्थ**—अर्जुन कौरवसैन्यवर जातांच त्यानें उत्तम प्रकारचा देवदत्त-नामक शंख वाजविला तो, जसा प्रलयकाळीं महादेव भयप्रद होतो तसा ह्या शंखाचा नाद सर्व लोकांस भयप्रद वाटला.

**टीप**—१ कौरवसैन्यावर ३ उत्तम प्रकारचा ४ नांवाचा ५ शंख ८ प्रळयकाळीं ९ महादेव १० भयप्रद.

**भ्याला उत्तर त्यातें, जिष्णु म्हणे पावलासि कांप दरें ॥**
**अद्यापि बांधिलेंसे तुझिया मतिनें अधैर्य कां पदरें ॥२३॥**

**अर्थ**—त्याला उत्तर भ्याला असें पाहून अर्जुन त्यास (उत्तरास) म्हणतो अरे, तूं शंखनादास भ्यालास? अद्यापिही तुझ्या बुद्धीनें तूं आपल्या पदरांत अधैर्य बांधलेंच कां आहेस? (म्ह० तूं अद्यापि भितोसच कां)

**टीप**—४ अर्जुन ७ भय ११ बुद्धीनें १२ पदरानें.

**पार्थ म्हणे वैराटे, रथ कुरुकटका समीप राहूं दे ॥**
**गोधन हरावयास्तव, आले भट कोण कोण पाहूं दे ॥२४॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणाला, हे उत्तरा, माझा रथ कौरवसैन्याजवळ उभा राहूं दे, आणि गाई हरण करण्याकरितां कोण कोण योद्धे आले आहेत, हेंही मला पाहूं दे.

**टीप**—१ अर्जुन ३ विराटाचा पुत्र—उत्तर ९ गाई १३ योद्धे.

**तो गुरु तो गुरुनंदन, तो कृप तो कर्ण तो पितामह रे ॥**
**यांहीं गाइ वळाव्या, शिव शिव गोपाळ रामकृष्ण हरे ॥ २५॥**

**अर्थ**—तो गुरु द्रोणाचार्य, तो गुरुपुत्र अश्वत्थामा, तो कृपाचार्य, तो कर्ण, तो भीष्माचार्य. (या प्रमाणें बोटानें दाखवून ह्मणाला) यांनीं गाई वळाव्या काय? (म्ह० हे योद्धे असून यांनीं गुराख्याचें काम करावें काय?) शिव शिव गोपाळ रामकृष्ण हरे!!!

**टीप**—१० शिव शिव इत्यादि सर्व पद, आश्चर्य सूचक आहे.

**रे उत्तरा शकुनिचा, या व्यूहांत न दिसे मला भाचा ॥**
**त्यावांचुनि याशीं जो, करणें संग्राम तो न लाभाचा ॥२६॥**

अर्थ—(अर्जुन म्हणतो,) "अरे उत्तरा, ह्या सैन्यांत मला शकुनीचा भाचा (दुर्योधन) दिसत नाहीं, यास्तव त्यावांचून यांच्याशीं (२६ व्या आर्येंत सांगितलेल्याशीं) युद्ध करणें कांहीं फायद्याचें नाहीं.

टीप—६ दुर्योधनाचा मामा. ७वहिणीचा. मुलगा १३युद्ध ४सैन्यांत.

हें कटक सोड तिकडे, चाल तुझ्या हरुनि गोधना पळतो ॥
प्राणत्राणपरायण, जिकडे निरपत्रपाग्रणी पळतो ॥ २७ ॥

अर्थ—हें सैन्य सोड आणि जिकडे तो दुष्ट, निर्लज्जशिरोमणी, आपले प्राण संरक्षण करण्याविषयीं तत्पर (दुर्योधन) तुझ्या गाई हरण करून पळत आहे तिकडे चल.

टीप—७ प्राण यांचें त्राण म्ह० संरक्षण करण्याविषयीं, परायण म्ह० तत्पर. ८ निर् म्ह० नाहीं, अपत्रपा म्ह० लज्जा ज्यांस त्यांत, अग्रणी म्ह० शिरोमणी.

उत्तर निज तुरगांतें, द्याया अरुणासि कौतुक पिटाळी ॥
तों गर्जोनि कुरुकटककर्णीं बसवी ध्वजस्थ कपि टाळी ॥२८॥

अर्थ—उत्तर आपल्या घोड्यांस, अरुणाला कौतुक वाटण्याजोगें, पिटाळता झाला; इतक्यांत (रथाच्या) निशाणावरील वानरानें (मारुतीनें) मोठी गर्जना करून कौरव सैन्याची कानटाळी बसविली.

टीप—५ आपल्या ६घोड्यास २सूर्याचा सारथी ३चमत्कार ९ध्वज म्ह० निशाण स्थ म्ह० असणारा—निशाणावर असणारा—मारुती.

कोठें जाल उभेरे, मत्स्येश्वर—धेनु—पश्यतो—हर हो ॥
सोडा गोधन नाहींतरि वधिन तुम्हांसि वश्य तो हर हो ॥२९॥

अर्थ—(अर्जुन त्यांस म्हणाला) "विराटाच्या गाई पाहतां पाहतां चोरून नेणारे चोर हो उभे रहा; आतां कोठें जाल? त्या गाई सोडा, नाहींतर प्रत्यक्ष सदाशिव जरी तुम्हांला साहाय झाला तरी मारीन."

टीप—१ मत्स्येश्वर म्ह० विराट याच्या धेनु म्ह० गाई त्यांस पश्यतोहर म्ह० पाहतां पाहतां हरून नेणारे. ११ शिव.

येतांचि विक्रमलवें श्रीहरिचा दयित दास वीर गडी ॥
हरि करिघटेसि जैसा त्या कुरुसेनेसि वासवी रगडी ॥३०॥

**अर्थ**—जसा सिंह हत्तीच्या समुदायास मारितो, तसा श्रीकृष्णाचा प्रिय भक्त, महा पराक्रमी, मित्र असा जो इंद्राचा पुत्र—अर्जुन, तो (त्या कौरव सैन्या जवळ) येतांच थोड्याशाच पराक्रमानें झोडिता झाला.

**टीप**—४ श्रीकृष्णाचा. ५ दयेंतला. २ सिंह. ३ हत्तीच्या समुदायास. ९ वासव म्ह० इंद्र याचा पुत्र वासवी म्ह० अर्जुन.

खळबळजळनिधिमग्ना, धेनु उसळल्या अलाबु झाल्या हो ॥
हांसूनि विजय मनिं म्हण, कां गोप—सखा मला बुजाल्या हो॥३१॥

**अर्थ**—कौरवाचें सैन्य हाच कोणी समुद्र त्या समुद्रांत बुडालेल्या गाई भोपळ्यासारिख्या ( एकदम ) उसळून वरती आल्या ( ह्म० त्या सैन्यांतून वेगळ्या झाल्या. ) तेव्हां अर्जुन आपल्या मनांत ह्मणूं लागला कीं, मी श्रीकृष्ण—सखा असतां मला कां वरें बुजाल्या आसाव्या.

**टीप**—२ खळ म्ह० दुष्ट याचे, बळ म्ह० सैन्य, हाच कोणी जळनिधी म्ह० समुद्र यांत, मग्ना म्ह० बुडालेल्या. ५ भोपळा. ७ अर्जुन. ११ गोपाळाच्या मित्रा-कृष्णा.

गेल्या पळोनि गाई, पृष्ठावरि पुच्छभार वाहोनी ॥
राहोनि निश्चळ क्षण, विजय निवे त्यांकडेच पाहोनी ॥३२॥

**अर्थ**—गाई आपल्या शेपट्या पाठीवर धरून तेथून पळून गेल्या; तेव्हां अर्जुन एक क्षणभर स्तब्ध राहून, त्या गाईकडे पाहूनच समाधान पावला.

**टीप**—२ पाठीवर. ३ शेपटें. ९ स्वस्थ.

# जरासंधवध.

मागधदेशांत (माळव्यांत) बृहद्रथ नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यास दोन बायका होत्या. त्या राजास पुत्रसंतान नव्हतें ह्मणून त्यानें चंडकौशिक ऋषीची फार सेवा केली. ऋषीनें, आपल्याठायीं राजाची पूर्ण भक्ति आहे, असें पाहून राजास सांगितलें कीं, हे राजा मी प्रसन्न झालों आहें तुला जो वर मागावयाचा असेल तो माग." राजानें विनंती केली कीं; "महाराज, मजला पुत्र नाहीं तो व्हावा," इतकीच इच्छा आहे, दुसरें कांहीं नाहीं ऋषीनें राजास एक आंब्याचें फळ दिलें आणि असें सांगितलें कीं, हें फळ तूं आपल्या बायकांस खावयास दे, ह्मणजे तुजला पुत्र होईल राजानें तें फळ आपल्या घरीं आणून, त्याचे सारखे दोन भाग करून आपल्या दोघी बायकांस दोन दिले, तेणेंकरून त्या दोघी बायकांसही गर्भ राहिला. नवमास पूर्ण झाल्यावर दोघींसही एका मुलाचा अर्धा भाग असे दोन भाग झाले. राजानें ते दोन भाग पाहून बाहेर फेंकून दिले. ते जरा नांवाच्या राक्षसीनें एका ठिकाणीं जोडून एक मूल केलें यावरूनच त्यास " जरासंध असें नांव पडलें. पुढें तो मुलगा राजानें तिजपासून मागून घेतला, बृहद्रथ राजा मृत्यु पावल्यावर जरासंध सिंहासनावर बसला. कांहीं दिवसांनंतर जरासंधानें आपल्या बाहु बळानें व पराक्रमानें सर्व राजे जिंकून बंदीशाळेंत घातले. हें अनीतीचें कृत्य श्रीकृष्णास न आवडून, धर्मापासून भीमार्जुनास मागून घेऊन भीमाकडून जरासंधाचा वध केला. ही कथा पुढील कवितेंत आहे.—

## ओव्या मुक्तेश्वरी.

**मागधराजा[१] आपले प्रौढी[२] ॥ सप्त द्वीप[३] समुद्र[४]—थडी ॥**
**जिंकोनि राजे लक्षकोडी[५] ॥ कारागृहीं[६] सूदिले[७] ॥ १ ॥**

**अर्थ**—( श्रीकृष्ण धर्मराजास सांगतो ) जरासंध राजानें आपल्या सा-

मर्थ्यानें सात खंडें आणि समुद्रकांठचा प्रदेश जिंकून कोट्यावधि राजे बंदिशाळेंत घातले.

टीप--१ माळव्याचा राजा- जरासंध. २ सामर्थ्यानें. ३ खंडें. ४ समुद्रकांठाचाप्रदेश ५.वीस ६.बंदिशाळेंत ७घातले.

तो हा जरासंध राणा ॥ बळें दळें नावरे कोणा ॥
हाकाळवरी कुरुनंदना ॥ म्यां उपेक्षिलें तयातें ॥ २ ॥

**अर्थ**—हे धर्मराजा, जो आंगबळानें व सैन्यानें कोणासही आटपत नाहीं व ज्याची मी आजपर्यंत हयगय केली ( अपराधाबद्दल ) तो हा जरासंध राजा आहे.

टीप—१ सैन्यानें. २ ह्या वेळेपर्यंत. ३ कुरु + नंदना--धर्मा. ४ कानाडोळा केला.

यश आयुष्य झालें पूर्ण ॥ बाहुयुद्धें शस्त्राविण ॥
करावें मागधाचें कदन ॥ इच्छा मातें उद्भेली ॥ ३ ॥

**अर्थ**—त्याचें यश आणि आयुष्य भरलें म्हणून त्याच्याशीं शस्त्रावांचून-मल्लयुद्ध (झोंबी) करून त्यास मारावें अशी मला इच्छा उत्पन्न झाली आहे.

टीप—१ झोंबीनें २ नाश, मारणें. ३ उत्पन्न झाली.

असो आतां शब्दरचना ॥ जाणें असे मागधहनना ॥
आज्ञा देईं भीमार्जुना ॥ दोघां जावया मजसवें ॥ ४ ॥

**अर्थ**—(कृष्ण ह्मणतो हे धर्मराजा) हें व्यर्थ बोलणें आतां राहूंद्या. प्रस्तुत जरासंधास मारावयास जावयाचें आहे यास्तव मजबरोबर जाण्याला भीम आणि अर्जुनास आज्ञा दे.

जातां बलिष्ठ शत्रूच्या कदना ॥ यश अपयश नेणवे कोणा ॥
परि कुशल असो भीमसेना ॥ ऐसें मनीं चिंतीं तूं ॥ ५ ॥

**अर्थ**—आतां बलवान शत्रूस मारावयास जावयाचें आहे, म्हणून त्यांत

जय होतो कीं पराजय होतो हें कोणासही समजत नाहीं, यास्तव तूं आपल्या मनांत "भीमसेन खुशाल असो" असें आणीत बैस.

**अम्ही दोघे साक्षीभूत[1] ॥ भीमहस्तें शत्रूचा निःपात[2] ॥**
**होईल ऐसा निश्चितार्थ[3] ॥ धर्मराजा जाणपां ॥ ६ ॥**

**अर्थ**––आम्ही दोघेजण साक्षिदाराप्रमाणें आहोंत आणि भीमाच्या हातून शत्रूचा पराभव होईल हें तूं खचित समज.

**टीप**––१ साक्षीदारा प्रमाणें. २ नाश. ३ खचितार्थ.

**धर्म म्हणे गा पुरुषोत्तमा ॥ तुझी कृपाकवच[1] आम्हां ॥**
**पांडव रक्षिता हा महिमा[2] ॥ लोकत्रयीं[3] प्रसिद्ध ॥ ७ ॥**

**अर्थ**––धर्म ह्मणाला, हे कृष्णा, तुझी कृपा हेंच आमचें चिलखत आहे (ह्मणजे तुझ्याच कृपेनें आमचें संरक्षण होतें) व तूं पांडवांचें रक्षण करणारा आहेस अशी कीर्ति त्रिभुवनांत गाजत आहे.

**टीप**–––१ चिलखत. २ कीर्ति. ३ स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ.

**करावया मागधकदन ॥ सवें निघाले तिघे जण ॥**
**भीमा अंगीं आवेश दारुण ॥ बाहुस्फुरण होतसे ॥ ८ ॥**

**अर्थ**––जरासंधास मारण्या करितां तिघेजण बरोबर निघाले, त्यावेळेस भीमाचे आंगांत मोठा आवेश भरला त्यायोगें त्याचे दंड स्फुरावयास लागले (उडूं लागले आणि फुगले).

**असो हे तिघे पुरुषव्याघ्र[1] ॥ तया नगरा पातले शीघ्र ॥**
**राजगृहीं जावया व्यग्र[2] ॥ द्वारमाथां वळघले[3] ॥ ९ ॥**

**अर्थ**––असो, हे तिघे पुरुषश्रेष्ट (व्याघ्ररूपी) त्या शहरास लवकर आले आणि राजवाड्यांत जाण्याकरितां फार उतावीळ झाले होते ह्मणून दारावरूनच वर चढले (वेशीवर).

**टीप**––१ व्याघ्ररूपी पुरुष. २ उत्सुक. ३ ओलांडला.

**स्नान करोनि श्वेतवसनीं ॥ चंदन चर्चूनि माळा घालुनी ॥**
**मार्ग सोडोनि राजसदनीं ॥ अमार्गींच प्रवेशले ॥ १० ॥**

अर्थ (ते तिघेजण) स्नान करून, पांढरीं वस्त्रें नेसून, गंध लावून गळ्यांत माळा घालून (अशी भट्टांची सोंगें घेऊन) मोठा रस्ता सोडून आड रस्त्यानें राजवाड्यांत शिरले.

**कुंजरवनामाजी[1] केसरी[2] ॥ कीं गोठणीं[3] प्रवेशिजे व्याघ्रीं[4] ॥**
**तैसे तिघे होमागारीं[5] ॥ जरासंधें देखिले ॥ ११ ॥**

अर्थ—हत्तीच्या रानांत जसा सिंह किंवा गाईच्या गोठ्यांत जसा वाघ शिरावा तसे हे तिघेजण जरासंधाच्या होमशाळेंत शिरतांना जरासंधानें पाहिलें.

टीप—१ कुंजर म्ह० हत्ती, त्यांच्या रानांत २ सिंह. ३ गाईंच्या गोठ्यांत. ४ वाघ ५ होम + आगार म्ह० घर होमशाळेंत.

**न बोलतां आशीर्वचनीं ॥ स्तंभप्राय[1] उभे मौनीं ॥**
**रायें देखोनि सन्मानीं ॥ प्रत्युत्थानीं[2] गौरविले ॥ १२ ॥**

अर्थ—कांहीं एक आशीर्वाद न करितां खांबासारिखे स्तब्ध उभे राहिले आहेत असें राजानें पाहून उठून त्यांस मोठा मान दिला.

टीप—१ खांबा सारिखे २ उठून

**कोठोनि येणें कोठवरी ॥ इच्छा केउती[1] असे पुढारी ॥**
**मानसीं असेल ती उत्तरीं ॥ प्रकट केली पाहिजे ॥ १३ ॥**

अर्थ—(जरासंध म्हणाला) तुम्ही आलां कोठून, तुम्हांला कोठपर्यंत जावयाचें आहे, तुमच्या मनांत इच्छा कोणची आहे, हें सांगा.

टीप—१ कोणची,

**न पाहतां तुमचे गुणागुण ॥ मागाल तें देईन दान ॥**
**या निश्चयें स्वस्थमन ॥ करूनि बोला याचक हो ॥ १४ ॥**

अर्थ—तुमचे गुण दोष न पाहतां तुम्ही जें मागाल तें दान देईन

असा निश्चय समजून, हे याचक हो, स्वस्थमन करून काय मागणें असेल तें बोला.

**कृष्ण म्हणे ऐक वचन ॥ वैरासि करणें नलगे यत्न ॥**
**दुष्ट जयाचें आचरण ॥ तोचि वैरी आमुचा ॥ १५ ॥**

अर्थ—कृष्ण ह्मणाला माझें बोलणें ऐक. द्वेष वाटण्यास मोठासा प्रयत्न लागतो असें नाहीं, ज्याची वर्तणूक वाईट आहे तोच आमचा शत्रु.

**राजे धरूनि लक्षावधी ॥ बद्ध करूनि सूदिले[1] बंदीं[2] ॥**
**त्यांचा होम मारणविधी[3] ॥ करूं पाहसी काय तूं ॥ १६ ॥**

अर्थ—लक्षावधि राजे धरून, त्यांस बांधून बंदीशाळेंत टाकिले आहेत आणि तूं त्यांचा जारण मारण विधीनें होम करूं पाहतोस काय?

टीप—१ घातले २ बंदीशाळेंत ३ शत्रु इ० कांस वेड लागावें किंवा मरण प्राप्त व्हावें एतदर्थ जो मंत्रप्रयोग तें

**आतां राजे करीं मुक्त ॥ हेंच मागणें आमचें येथ ॥**
**नाहीं ह्मणसीं तरी अनर्थ ॥ येचि काळीं पाहशील ॥ १७ ॥**

अर्थ—"आतां राजांस सोडून दे" हेंच आमचें ह्या टिकाणीं मागणें आहे. नाहीं ह्मणशील तर ह्याच वेळेस मोठा अनर्थ तुझ्या दृष्टीस पडेल.

**राजे सोडविलियाविणें ॥ आम्हांसि सहसा नाहीं जाणें ॥**
**पैजेनें प्राण देणें घेणें ॥ द्यूत खेळणें हे येथें ॥ १८ ॥**

अर्थ—राजे (बंदिशाळेंतून) सोडाविल्यावांचून आम्ही कधींही जाणार नाहीं, त्याबद्दल पैजेनें (आपले) प्राण देऊं किंवा (तुमचे) घेऊं हीच जुगार येथें आम्ही खेळणार.

**हाव[1] न धरिशी संग्रामीं ॥ तरी बलात्कारें उठवूं आम्ही ॥**
**ऐसें बोलतां पराक्रमी ॥ जरासंध क्षोभला ॥ १९ ॥**

अर्थ--"युद्ध करण्याची जर तूं ईर्षा धरली नाहींस तर तुला बलात्कारानें (युद्धास) उठवूं" असें पराक्रम करणारा (श्रीकृष्ण) म्हणतांच जरासंध रागावला.

टीप--१ इच्छा

**पुसोनियां उभय नेत्र ॥ न्यहाळूनि पाहे तयांचें वक्त्र[1] ॥**
**म्हणे हा पांडवांचा मित्र ॥ होय सत्यकीं विचारें ॥ २० ॥**

अर्थ--(जरासंधानें) आपले दोन्ही डोळे पुसून त्याचें (कृष्णाचें) तोंड न्याहाळून पाहिलें आणि तो विचार करून ह्मणाला हा खरोखर पांडवाचा मित्र (कृष्ण) आहे.

टीप--१ तोंड

**जो भटीव[1] जेठिया[2] ऐसा ॥ चढत तेज मुख प्रकाशा॥**
**भीमा ऐसा अंगठसा[3] ॥ माझे दृष्टीं दिसत असे ॥ २१ ॥**

अर्थ--जो बनलेल्या मल्लासारिखा असून ज्याच्या मुखाचें तेज फांकत चाललें आहे आणि भीमा सारिखा ह्याचा आंगलोट आहे तेव्हां हा भीम असावा असें मला दिसतें.

टीप--१ कसलेला, बनलेला २ मल्लासारिखा ३ आंगलोट

**तिसरा जो का आजानुबाहो[1] ॥ तो द्रौपदीचा तिसरा नाहो[2] ॥**
**जेणें करूनि खांडवदाहो[3] ॥ तोषाविलें त्रिपादातें[4] ॥ २२ ॥**

अर्थ--हा तिसरा, ज्याचे हात गुढघ्यापर्यंत आहेत, जो द्रौपदीचा तिसरा नवरा व ज्यानें खांडववन अग्नीस अर्पण करून त्यास तृप्त केलें असा-हा (अर्जुन )आहे.

टीप--१ आ म्ह० पर्यंत, जानु म्ह० गुडघे, बाहू म्ह० हात, ज्याचे हात गुडघ्या पर्यंत आहेत असा, हें राजचिन्ह आहे, २ नवरा ३ खांडववन दहन केलें ४ अग्नीस.

**जरासंध असतां जीत[1] ॥ नरेंद्र[2] मोचनाची मात[3] ॥**
**करी ऐसा वीर श्रीकांत[4] ॥ भुवनत्रयीं[5] असेना ॥ २३ ॥**

अर्थ—हे श्रीकांत ( कृष्णा ) जोंपर्यंत हा जरासंध जिवंत आहे तोंपर्यंत राजे सोडविण्याची गोष्ट बोलणारा असा वीर ह्या त्रिभुवनांत नाहीं.

टीप—१ जिवंत २ नर + इंद्र म्ह० राजे ३ गोष्ट ४ श्री म्ह० लक्ष्मी हिचा कांत म्ह० नवरा असा श्रीकृष्ण ५ त्रिभुवनांत

[1]खद्योत उजाळी रविमंडळा ॥ मुंगी उचली [2]ब्रम्हांडगोळा ॥
तेंवि तुझें बोलणें [3]बरळा ॥ शक्तीहूनि [4]अचाट ॥ २४

अर्थ—काजव्यानें सूर्यमंडळास उजेड दाखवावा किंवा मुंगीनें हा भूगोल उचलावा, त्या प्रमाणें हे मूर्खा, तुझें बोलणें शक्तीच्या बाहेर आहे.

टीप—१ काजवा २ भूगोल, पृथ्वी ३ बडबडणाऱ्या ४ जास्त, मोठें

अवलोकुनि आपणाकडे ॥ शक्तीसारिखें बोलिजे थोडें ॥
[1]याचकजीविकेचेनिपाडें ॥ मागू येतां मागावें ॥२५ ॥

अर्थ—(जरासंध ह्मणतो) आपल्याकडे पाहून आपल्या शक्तीप्रमाणें थोडेंच बोलावें; (तुह्मी भिक्षुकवृत्ति धारण केली आहे) ह्या वृत्तीप्रमाणें मागण्यास आलां आहां म्हणून तसें मागा.

टीप—१ भिक्षुक वृत्तीप्रमाणें

[1]कंसारि संसार–गज–[2]केसरी ॥ हासोनि बोले कृष्ण शौरी ॥
पांडुकुमार हे निर्धारीं ॥ भीमार्जुन जाणपां ॥ २६ ॥

अर्थ—जो कंसाचा शत्रु, संसाररूप हत्तीस केवळ सिंह, व वसुदेवाचा पुत्र श्रीकृष्ण हंसून ह्मणाला हे पंडु राजाचे पुत्र भीम, अर्जुन आहेत हें खचीत समज.

टीप—१ कंस + अरि म्ह० कंसाचा शत्रु २ सिंह

मागां अपराध केले क्षमा ॥ ते [1]कार्याकारणें [2]पुरुषाधमा॥
लोटली मर्यादेची सीमा ॥ शेवटील फळ भोगिजे । २७ ॥

अर्थ—हे दुष्टा, तुझे मागील अपराध कांहीं कारणामुळें क्षमा केले;

आतां क्षमा करण्याची सीमा झाली यास्तव तुला जें शेवटचें फळ देतों तें भोग.

टीप—१ कामामुळें २ पुरुष + अधमा म्ह० पुरुषांतील दुष्ट.

**सरला सुकृताचा[1] तंतू ॥ आयुष्यतैला झाला अंतू ॥**

**माझियेहस्तीं व्यजनवातू[2] ॥ भीमरूपें उदेला ॥ २८ ॥**

अर्थ—तुझा पुण्यरूप तंतू म्ह० वात संपली, तुझें आयुष्यरूप तेल त्याचाही अंत झाला, आतां माझ्या हातानें पंख्याचा वारा भीम रूपानें उत्पन्न झाला आहे. (तुझें पुण्य सरले व आयुष्यही संपले म्हणून माझ्या सांगण्यावरून भीम येथें तुला मारण्या करितां प्राप्त झाला आहे.)

टीप—१ सु म्ह० चांगलें, कृत म्ह० केलेलें--पुण्य २ पंख्याचा वारा.

**तो झडपतां[1] सत्वरगतीं ॥ प्राणदीप पंच ज्योती[2] ॥**

**मालवोनि पडेल क्षितीं[3] ॥ गात्रपात्र[4] पालथें ॥ २९ ॥**

अर्थ—तो वारा आला म्हणजे तुझे पांच प्राण हेच पांच दिवे ते मालवून शरीररूप जें दीपपात्र (समयी) तें पृथ्वीवर पालथें पडेल (म्ह० तुझे पंचप्राण जाऊन तूं मरून तुझा देह पृथ्वीवर पडेल.)

टीप—१ सुटला असतां २ ज्वाला ३ पृथ्वीवर ४ शरीररूप पात्र

**असेल वांचावयाची आर्ती[1] ॥ तरी करीं बंधमुक्ती[2] ॥**

**मग आम्हां तुम्हां अर्थाअर्थीं[3] ॥ वैरसंबंध असेना ॥ ३० ॥**

अर्थ—जर तुला वांचण्याची इच्छा असेल तर राजांस सोडून दे. आणि तूं हें केलें म्हणजे तुमचा आमचा द्वेषसंबंध अर्थांत राहणार नाहीं.

टीप—१ इच्छा २ बंदीशाळेंतून मुक्तता ३ कांहीं देखील, थोडा देखील.

**करीं राजयांचें मोचन[1] ॥ कीं उठीं युद्धा न लागतां क्षण ॥**

**या वेगळा विचार आन[2] ॥ करणें आतां घडेना ॥ ३१ ॥**

अर्थ—राजांची मुक्तता कर किंवा एक क्षण न लावतां युद्ध करण्यास ऊठ याशिवाय दुसरा विचार आतां घडणार नाहीं.

टीप—१ सोडून देणें २ दुसरा.

आतां बोलिलासी वचन ॥ मागाल तें देईन दान ॥
न करितां नृपांचें मोचन ॥ ऊठ वेगीं संग्रामा ॥ ३२ ॥

अर्थ—आतांच बोललास कीं, "तुह्मी मागाल तें दान देईन" (त्याठिकाणीं राजांची मुक्तता हेंच आमचें मागणें आहे) जर राजांची सुटका न करशील तर युद्धास लवकर ऊठ.

टीप—१ सुटका २ युद्धास.

तिघांमाजी जो आवडे ॥ त्यासीं भिडें वाडेंकोडें ॥
मागध म्हणे मृषा तोंडें ॥ जल्पना करिसी वाचटा ॥ ३३ ॥

अर्थ—आह्मां तिघांत जो आवडेल त्याच्याशीं खुषीनें युद्ध कर हें ऐकून जरासंध ह्मणाला, हे वाचाळा, तोंडानें व्यर्थ किती बडबड करितोस. (तो प्रसंग फार दुर्घट आहे.)

टीप—१ युद्ध कर २ खुषीनें ३ व्यर्थ ४ बडबड ५ वाचाळा.

तूं बहुरूपें दाविसी सोंगें ॥ कोणतें युद्ध जिंकिलें आंगें ॥
वेडीं बागडीं भाविकें भणगें ॥ तुझें शूरत्व त्यांमाजी ॥ ३४ ॥

अर्थ—तूं नानाप्रकारचीं रूपें धारण करून सोंगें दाखवितोस, तूं स्वतः आपण होऊन युद्ध करून जय कोणचा मिळविला. वेडसर भाविक भिकारी लोकांमध्यें मात्र तुझें शौर्य मोठें खरें.

टीप—१ वेडसर २ भाविक ३ भिकारी.

पार्थ पृथेचें सुकुमार बाळ ॥ शस्त्राभ्यासें क्रमीत काळ ॥
मजसीं अयोग्य परी अळुमाळ ॥ भीम कांहीं दिसतसे ॥ ३५ ॥

अर्थ—पार्थ (अर्जून) हें पृथेचें कोमळ मूल असून आजपर्यंत त्यानें

शास्त्राचा अभ्यास करून काळ घालविला (तेव्हां तोही मज बरोबर युद्ध करण्यास योग्य नाहीं) आतां भीम देखील मजबरोबर युद्ध करण्यास अयोग्यच आहे परंतु कांहींसा बरा आहे.

टीप--१ घालवीत २ कांहींसा.

तोही मंद जड आळशी ॥ आहार[1] निद्रा[2] बहुत याशीं ॥
आयुष्य पुरलें ह्मणूनि ऐशी ॥ बुद्धी उपजली तुह्मांतें ॥ ३६ ॥

अर्थ--तो देखील सुस्त, जड, आळशी असून त्याचा आहार मोठा आहे व त्यास झोंपही फार आहे. तुमचें आयुष्य सरलें ह्मणूनही (माझ्याशीं युद्ध करण्याची) इच्छा उत्पन्न झाली आहे.

टीप--१ खाणें २ झोंप.

तिघांतें हाणोनि चटकणा[1] ॥ क्षणांत मिळवीन मरणा ॥
बळें सर्पाचिया सदना[2] ॥ मंडूक[3] वस्ती पातला ॥ ३७ ॥

अर्थ--तुम्हां तिघांस थपडा मारून एका क्षणांत ठार मारून टाकीन. तुम्ही जे बेडूक ते मी जो सर्प त्या माझ्या घरांत बळेंच राहण्याला आलां आहां. (म्हणजे बेडूक सर्पाच्या घरीं गेला असतां जसा वांचत नाहीं त्याप्रमाणें तुम्ही बळेंच मृत्यूच्या तोंडांत येऊन पडलां आहां तेव्हां कधीं वांचणार नाहीं.)

टीप--१ थपडा, चपराक २ घरीं ३ बेडूक.

कृष्ण म्हणे बोलसी निधड[1] ॥ मंडूक किंवा तिघे गरुड[2] ॥
आतांचि होईल हा निवाड[3] ॥ समय प्राप्त झालिया ॥ ३८ ॥

अर्थ--कृष्ण ह्मणाला मोठ्या धिटाईनें बोलतोस खरा परंतु आतां या प्रसंगीं आम्ही तिघे बेडूक आहों किंवा गरुड आहों याचा निर्णय होईल.

टीप--१ धैर्यानें २ एक पक्षी आहे तो सर्पास खातो. ३ निर्णय, निवाडा.

ऐसें बोलोनि वीरमणी[1] ॥ उभेठेले[2] समरांगणीं[3] ॥

जरासंधें राज्यासनीं[४] ॥ अभिषेकिलें पुत्रासी ॥ ३९ ॥

अर्थ---ते तिघेजण वीरश्रेष्ठ असें बोलून युद्धभूमीवर (युद्धास) उभे राहिले. इकडे जरासंधानें आपल्या पुत्रास राज्याभिषेक करून गादीवर बसविलें.

टीप—१ वीरश्रेष्ठ २ उभे राहिले ३ समर + अंगणीं ह्म० युद्धाच्या जागीं ४ राज्य + आसनीं ह्म० राज्याच्या गादीवर.

सरसावूनि वीरगुंठी[१] ॥ भीम लक्षिला दारुण[२] दृष्टी ॥
जैसा मदोन्मत[३] करटी[४] ॥ मृगेश्वरें[५] लक्षावा ॥ ४० ॥

अर्थ---जरासंधानें आपल्या मस्तकावरील केंसांचा बुचडा बांधून जसा सिंह मोठ्या मस्त झालेल्या हत्तीकडे पाहतो तसे भीमाकडे मोठ्या भयंकर दृष्टीनें पाहिलें.

टीप—१ केंसांचा बुचडा २ भयंकर ३ मदानें उन्मत्त झालेला ४ हत्ती ५ मृग ह्म० श्वापदें यांत ईश्वर ह्म० श्रेष्ठ असा सिंह त्यानें.

भीमा अंगीं वीरश्री लोटू[१] ॥ धरितां न धरवे अति उद्भटू[२] ॥
अगस्ती धांवें समुद्रघोटू[३] ॥ तैसा तगटे[४] पुढारा ॥ ४१ ॥

अर्थ—भीमाचे आंगांत इतका अतिशयित वीरश्रीचा आवेश भरला कीं, तो त्याच्यानें सुद्धां आंवरून धरवेना, आणि जसा अगस्ति ऋषि समुद्र प्यावयास गेला तसा भीम पुढें धांवून गेला.

टीप—१ वेग २ मोठा, न आंवरण्याजोगा ३ पिण्यास ४ जाऊं लागला.

दोघांनीं पिटिलीं पाणितळें[१] ॥ जानुमूळें[२] बाहुमूळें[३] ॥
मही[६] ताडितां पादतळें[४] ॥ शैलमौळी[५] थरकती ॥ ४२ ॥

अर्थ---त्या दोघांनीं तळहात, मांड्या आणि दंड ठोकले, आणि जेव्हां ते आपले तळपाय जमिनीवर आपटूं लागले तेव्हां पर्वतांचीं शिखरें थरथर हलूं लागलीं.

टीप--१ तळहात २ मांड्या ३ दंड ४ तळपाय ५ पर्वतांचीं शिखरें ६ पृथ्वी.

धांवोनि भीमाची वीरगुंठी[१] ॥ मागधें कवळोनियां मुष्टीं ॥
दक्षिण हस्त[२] सूदिला[३] कंठीं[४] ॥ काळपाशा सारिखा ॥ ४३ ॥

अर्थ—जरासंधानें धांवून आपल्या मुठींत भीमाची शेंडी धरली आणि आपला उजवा हात यमाच्या फांसासारिखा त्याच्या (भीमाच्या) कंठावर दिला.

टीप—१ केंसाचा बुचडा २ उजवा हात ३ दिला ४ गळ्यावर.

दांत चावोनि करकराटी ॥ गुडघा ताडिला हृदयपुटीं[१] ॥
सावध म्हणती कृष्णकिरीटी[२] ॥ बापा भीमा बलिष्ठा ॥ ४४॥

अर्थ--(जरासंधानें) करकर दांत चावून आपला गुडघा त्याच्या उरावर मारिला तेव्हां कृष्णार्जुन म्हणाले, बापा बलिष्ठा भीमा, "सावध रे सावध"

टीप--१ हृदय म्ह० छाती, पुट म्ह० जोडा,—उरावर. जेथें असा दोन शकलांचा संबंध येईल तेथें पुट असा शब्द जोडतात. जसें चंचूपुटें २ अर्जुन.

भीमें भैरवाकार दृष्टी ॥ हृदयीं हाणोनि वज्रमुष्टी[१] ॥
सोडवोनि मगरमिठी[२] ॥ झिंजाडोनि लोटिला ॥ ४५ ॥

अर्थ--भीमानें मोठ्या भयंकर दृष्टीनें त्याजकडे पाहून त्याच्या उरावर वज्रासारिखी बुकी मारली, हिसडा मारून त्याची मगर मिठी सोडविली आणि त्याला लोटून दिलें.

टीप--१ वज्राप्रमाणें बुकी २ ही मिठी कांहीं केलें असतां सुटत नाहीं. हिस हें नांव पडण्याचें कारण असें आहे कीं, मगर म्हणून एक प्राणी आहे, त्याची मिठी जशी सुटत नाहीं तशी ही न सुटणारी आहे म्हणून हीसही मगरमिठी म्हणतात.

तेणें मागुती विकळ[१] ॥ पाडिला जैसा विशाळताळ[२] ॥
पुढती उठोनि उतावेळ ॥ भीममध्य कवळिला[३] ॥ ४६ ॥

अर्थ—(त्या बुकीच्या योगानें) जसा एखादा उंच ताडाचा वृक्ष पडा-

वा त्याप्रमाणें तो (जरासंध) मूर्छित पडाला. पुन्हां लवकर उठून त्यानें भीमाची कंबर धरली.

टीप—१ मुर्छित २ मोठा ताडाचा वृक्ष ३ भीमाची कंबर.

**दोन्ही कोंपर दोन्ही मुष्टी ॥ चारी आघात ओपिले पृष्टीं ॥**
**मागधें क्षोभोनि उल्हाटी ॥ हुमणी हाणीतली मस्तकीं ॥४७॥**

अर्थ—भीमानें दोन कोपरें आणि दोन मुठी असे चार तडाके पाठीवर दिले, तेव्हां जरासंधानेंही रागावून उलट त्याच्या मस्तकावर बुक्की मारिली.

टीप—१ ठोके, घाव २ दिले ३ रागावून ४ उलटी ५ बुकी.

**झोंबी सोडवोनि तवकें ॥ मस्तकें मस्तका देती धडके ॥**
**सहस्रसंख्या होतां भडके ॥ अशुद्धाचे लोटती ॥ ४८ ॥**

अर्थ—झोंबी सोडवून क्रोधावेशानें एकमेकांचे मस्तकावर मस्तकें आपटूं लागले; असें हजारों वेळ झालें तेव्हां रक्ताचे पाट वाहूं लागले.

**हस्त ओढिती तोडावया ॥ पाय कवळिती मोडावया ॥**
**डोळे पाहती फोडावया ॥ पाडावया दशनांतें ॥ ४९ ॥**

अर्थ—ते दोघे परस्पराचे हात तोडण्याकरितां ओढूं लागले, पाय मोडण्याकरितां धरूं लागले, डोळे फोडण्याकरितां पाहूं लागले, आणि दांतही पाडण्याकरितां पाहूं लागले.

टीप—१ दातांला.

**कुर्परप्रहार लत्ताप्रहार ॥ मुष्टिप्रहार मस्तकप्रहार ।**
**मोजोनि मारिती शत सहस्र ॥ उसणें घेघे म्हणोनी ॥५०॥**

अर्थ—ते दोघे परस्परांस कोपरखळ्या देऊं लागले, लाथा बुक्या मारूं लागले, डोक्याच्या लक्षावधि टकरा ( तूं दिल्या होत्या त्या )" आपल्या उसन्या घे " ह्मणून मोजून मारूं लागले.

टीप—१ कोपरखळ्या २ लाथाचा भडिमार.

बाहु गदा बाहु मुसळें ॥ बाहु कांतिया[1] करवाळें[2] ॥
बाहु मुद्गर[3] बाहु त्रिशूळें[4]॥ भावोनिया[5] मारिती ॥ ५१ ॥

अर्थ—आपले हात हीच कोणी गदा आपले हात हींच कोणी मुसळें, (ह्याप्रमाणेंच) बरच्या तरवारी, मुदगल, त्रिशूळ आहेत असें मानून एकमेकांस ( हात ) मारूं लागले.

टीप—१ बरच्या २ तरवारी ३ मुदगल ४ त्रिशूळ ५ मानून.

नगरनारी[1] नागरिक[2] ॥ पाहती दोघांचें युद्धकौतुक ॥
विमानयानीं[3] वृंदारक[4] ॥ जय इच्छिती भीमाचा ॥ ५२ ॥

अर्थ—शहरांतील स्त्रिया व पुरुष ह्या दोघांचा युद्धचमत्कार पाहूं लागले आणि (स्वर्गांत) देव विमानांत बसून भीमाचा जय इच्छित होते.

टीप—१ नगरवासी स्त्रिया २ नगरवासी पुरुष ३ विमानांत देव.

निराहार[1] निरुदक[2] ॥ विसावा न घेतां पळ एक ॥
तेरा दिवस पर्यंत देख ॥ युद्ध चाललें दोघांचें ॥ ५३ ॥

अर्थ—कांहीं न खातां, कांहीं न पितां व क्षणभर देखील विश्रांति न घेतां, पहा असें त्या दोघांचें तेरा दिवस—पर्यंत युद्ध चाललें होतें.

टीप—निर् १ म्ह० नाहीं, आहार म्ह० खाणें—खाण्यावांचून २ पाण्यावांचून.

चवदावे दिवसाचे अंतीं ॥ मूर्छागवला[1] मागधनृपती[2] ॥
तैं संकेत[3] दावी हातीं ॥ पांडवातें[4] माधव[5] ॥ ५४ ॥

अर्थ—चवदावे दिवशीं जरासंधास मुर्छा आली, तेव्हां कृष्णानें हातांनीं भीमास खुण केली.

टीप—१ व्याकूळ झाला २ माळव्याचा राजा—जरासंध ३ खूण ४ भीमास ५ श्रीकृष्ण.

पाय कवळोनि करतळीं ॥ चिरोनि करावा दोन्ही फाळीं[1] ।
जरेनें[2] सांधिला तो उखळीं ॥ सांधा वेगें बळिष्ठा ॥ ५[illegible] ॥

अर्थ--- ( श्रीकृष्णानें खुण केली ती ) कृष्ण म्हणाला, त्याचे पाय धरून, चिरून त्याच्या दोन फाळी कर ( आणि उजव्या हातची डावीकडे आणि डावे हातची उजवीकडे टाक) कारण हे बाळिष्ट भीमा, जरेनें सांधला आहे तो सांधा उसकटून टाक.

टीप—१ शकलें २ जरा नांवाच्या राक्षसीनें.

या वेगळा उपाय आन[1] ॥ करितां मागध नपावे मरण ॥
आतांचि होऊनि सावधान[2] ॥ युद्ध करील मागुती[3] ॥ ९६ ॥

अर्थ--या (वरील )उपायावांचून दुसरा उपाय केला असतां जरासंध मरणार नाहीं आणि आतां सावध होऊन पुन्हा युद्ध करूं लागल.

टीप--१ दुसरा २ सावध ३ पुन्हा.

भीमें रगडोनि दाढा ॥ मध्य भागीं कवळिला[1] गाढा[2] ॥
माथां वाहोनिया भवंडा[3] ॥ चक्राकार दीधला ॥ ९७ ॥

अर्थ— ( कृष्ण वरल्या ओवीप्रमाणें म्हणतांच ) भीमानें दाढा चावून त्याच्या कमरेला घट्ट धरलें आणि डोक्यावर घेऊन चाका प्रमाणें फेरा दिला ह्म० त्यास गरगर फिरविलें.

टीप—१ अवळला २ घट्ट ३ गिरका, फेरा.

तेथूनि टाकिला भूतळीं ॥ लाथ वोपिली[1] वक्षस्थळीं[2] ॥
वज्रें तोडोनियां मौळी[3] ॥ शक्र[4] जेवी पर्वता ॥ ९८ ॥

अर्थ—जसा इंद्र पर्वताचें शिखर वज्रानें तोडून पर्वत खालीं पाडतो त्याप्रमाणें भीमानें जरासंधास जमिनीवर टाकिलें आणि त्याच्या उरावर लाथ दिली.

टीप—१ दिली २ उरावर ३ पर्वताचें शिखर ४ इंद्र.

तेंवी पाडोनि उताणा ॥ वामपायें[1] दक्षिणचरणा[2] ॥
रगडोनि सव्यपाय[3] जाणा ॥ उभयहस्तें कवाळिला ॥ ९९ ॥

अर्थ—ह्या प्रमाणें त्यास (जरासंधास) उताणें पाडून भीमानें आपल्या डाव्या पायानें त्याचा (जरासंधाचा) उजवा पाय दाबून आपल्या दोन्ही हातांनीं त्याचा डावा पाय धरला.

टीप—१ डाव्यापायानें. २ उजवापाय. ३ डावापाय.

आंसडोनि काळोद्भटें[1] ॥ मध्यें उताटिला तटाटें ॥
असृङ्नदी[2] खळखळाटें ॥ रंगभूमिके लोटली ॥ ६० ॥

अर्थ—(वर सांगितल्या प्रमाणें) भीमानें धरून आंसडा मारिला (त्यासरसें) नखोमख (शरीर) तटतट तुटून दोन फाळी झाल्या, तेव्हां रक्ताची नदी खळखळ वाहूं लागली.

टीप—१ काळासारिख्या—भयंकर भीमानें. २ रक्ताची नदी.

भीमसेनें आपल्या हातीं ॥ करोनि शकलें सांडिलीं क्षितीं[1] ॥
जरासंधा दिधली मुक्ती ॥ कुंती कुमारें[2] यापरी ॥ ६१ ॥

अर्थ—भीमानें आपल्या हातांनीं जरासंधाच्या दोन फाळी करून पृथ्वीवर टाकिल्या. याप्रमाणें कुंतीच्या पुत्रानें (भीमानें) जरासंधास मुक्ति दिली (म० मृत्युलोकांतून घालविलें) मुक्त केलें.

टीप—१ पृथ्वीवर. २ कुंतीचा पुत्र—भीम.

---

# अन्योक्ति कलाप.

अलंकाराचा उपयोग शोभा आणणें हा होय. जसा प्राण्यास सुशोभित करणारा अलंकार (दागीना) असतो त्या प्रमाणें भाषणास किंवा लेखनास सुशोभित करणारे ही अलंकार आहेत. अलंकाराच्या योगानें वक्त्याचें

भाषण ऐकणारास चांगलें ठसतें व कानास मधुर लागतें. संस्कृत भाषेंत जो शार्ङ्गधर ह्मणून एक ग्रंथ आहे त्या ग्रंथाच्या आधारानें प्रख्यात वे० शा० सं० रा० रा० कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं कांहीं पद्यें रचून पद्यरत्नावली नामक रसिक काव्यांत ओविली आहेत, त्यांपैकीं निवडून ह्या पुस्तकांत घेतलीं आहेत.

अन्योक्ति ह्या अलंकाराची अशी व्याख्या आहे कीं, ज्यांत ज्या विषयीं किंवा ज्यास बोलावयाचें त्यापेक्षां निराळ्याविषयीं किंवा निराळ्यास बोलणें किंवा ज्यामध्यें चांगलें शब्द किंवा वाईट शब्द बोलून अर्थ अगदीं उलटा निघतो त्यास अन्योक्ति अलंकार म्हणतात.

## आन्योक्तिकलापांतील.

### कोकिलान्योक्ति.

ज्याचे[८] पूर्वीं[१] वसंतीं[२] परिमलबहलीं[३] आम्रवृक्षीं[४] सुखाचे[५] ॥
गेले[११] गुंजारवातें[६] दिवस[१०] परिसतां[७] मत्तभृंगांगनांचे[९] ॥
केसे[१७] त्या[१२] कोकिलातें[१३] अधम[१५] कारिति[१९] हे[१४] कावळे[१६] चंचुघातां[१८] ॥
कोठें[२३] थारा[२४] मिळेना[२५] गरिब[२६] पळतसे,[२७] वांकडा[२०] काळ[२१] येतां[२२] ॥ १ ॥

**अर्थ**—पूर्वीं वसंत ऋतूंत सुगंधानें पूर्ण भरलेल्या अशा आंब्याच्या झाडावर बसून, धुंद झालेल्या अशा भुंग्याच्या माद्यांचे गुंजारव ऐकून, ज्या कोकिलाचे मोठ्या आनंदानें दिवस गेले; त्या कोकिलेस आतां हे दुष्ट कावळे पहा कसें चोचांनीं टोचीत आहेत!!! यास्तव कवि म्हणतो, विपरीत काळ आला असतां गरीब विचाऱ्यास आश्रय कोठेंही न मिळून, तो इकडे तिकडे भटक्या मारीत फिरतो.

**उद्देश**---एखाद्या श्रीमंत गृहस्थानें, श्रीमंती असतां, ऐष आराम भोगून दारिद्र अवस्थेंत यावें त्यावेळेस इतर लोक त्याच्याशीं जें वर्तन करितात व जी त्याची स्थिति होते, त्यास ही अन्योक्ति लक्षून आहे.

**टीप**---२ वसंतऋतूंत ३ परिमल ह्म० सुगंध, बहलीं ह्म० पूर्ण-सुगंधानें पूर्ण ६ भुंग्याचे शब्दास ९मत्त ह्म० धुंद झालेल्या, भृंग ह्म० भुंगे यांच्या अंगनांचें म्ह०स्त्रियांचे १५ दुष्ट १८ चोंचीनें मारणें.

१३ ११ १२ १४ १६ १५
पढोत शुक सारिका शिखि वदोत केकाध्वनी ॥
२१ १८ १९ २० १७
करोत कलहंसही बहुत गायनातें वनीं ॥
३ ५ ४ ६ १०
रसालतरुंच्या शिरीं कुसुमितीं बसोनी करी ॥
९ २ ७ ८ २ १
न कोकिल सुधासम स्वन वनांतरीं जोंवरी ॥ २ ॥

**अर्थ**—जों पर्यंत कोकिल इतर वनांत आहे आणि फुललेल्या आं-ब्याच्या झाडाच्या शेंड्यावर बसून कोकिल आपला अमृतासारखा मधुर स्वर काढीत नाहीं तोंपर्यंत राघू, मैना पढोत, मोर केकाध्वनी करोत (आपआपले शब्द करोत,) अथवा रानामध्यें राजहंस फार गायन करोत; तथापि कोकिलाच्या स्वरापुढें त्याचें गाण्याचें कांहीं एक तेज पडत नाहीं.

**उद्देश**—साधारण गुणाच्या मंडळींत एखादा अत्यंत गुणवान् पुरुष आला असतां त्यापुढें सामान्य गुणाच्या मंडळींतील मनुष्याचें तेज पडत नाहीं; ह्या गोष्टीला लक्षून ही अन्योक्ति आहे.

**टीप**—२॥ इतरवनांत ३ आंब्याच्या झाडाच्या ४ फुललेल्या ७ अमृतासारखा ८स्वर ११ राघु १२ मैना १४ मोर १५ मोराचे शब्द १८ राजहंस.

## चातकान्योक्ति.

१ २ ३ ४ ५ ६ ७
झाडें पालवती लता उगवती वेलां फुलें शोभती ॥
८ ९ १० १२ १५ ११ १४ १३
मेघें वृष्टि करोनि तुष्टि दिधली सृष्टीस पुष्टीहि ती ॥
१६ १७ १९ २० १८ २१ २३ २२ २४
रेरे चातक काय पातक तुवां केलें न आम्हां कळे ॥
२५ २७ २६ ३० ३१ २९ ३२ २८ ३३
वारी वर्षुनि भारि एक कणही त्याचा न तूतें मिळे ॥ ३ ॥

**अर्थ**—पर्ज्यन्य पडून झाडास पालवी फुटली आहे, वेली उगवल्या आहेत, वेलांस फुलें येऊन ते शोभत आहेत, व पर्ज्यन्य पडून पृथ्वी तृप्त व पुष्ट झाली आहे, म्ह० जिकडे तिकडे धान्यें उगवलीं आहेत; इतक्या ही गोष्टी झाल्या असतां रे चातका, तूं काय पातक केलें आहे हें आम्हांस कांहीं एक कळत नाहीं, कारण इतका पुष्कळ पर्ज्यन्य पडून त्यांतील एक थेंब देखील तुला मिळत नाहीं!!!

**उद्देश**—एखादा राजापासून अथवा उदार गृहस्थापासून सर्वत्रांस

फायदा होत असतां एखाद्या पुरुषासच कांहीं एक फायदा होत नाहीं, ह्या गोष्टीस ही अन्योक्ति लक्षून आहे.

**टीप**---३ वेळी ८ पर्जन्यानें १२ तृप्तता ११ पृथ्वीस १४ पुष्टता १७ चातक पक्षी २५ पाणी २७ पाहून.

५ ६ ७ २ १ ४ ३
**तें अन्य मेघ तव जे हरिती तृषेतें ॥**
१० ८ ९ १२ ११
**कां व्यर्थ आरडुनि शोषविशी जिभेतें ॥**
१३ १४ १६ १५ १७ १८
**हे चातका घन रिते शिशिरांत येती ॥**
१९ २० २१ २३ २२ २४
**ते गर्जती परि न वारिकणास देती ॥४॥**

**अर्थ**--हे चातका, तुझी तहान भागविणारे मेघ दुसरेच आहेत, मग (हे मेघ पाहून) उगीच ओरडून आपली जीभ कां कोरडी करीत आहेस? हे पोकळ मेघ शिशिर ऋतूंत येतात आणि मोठ्यानें गर्जतात; परंतु ह्यापासून पाण्याचा एक बिंदु देखील मिळत नाहीं.

**उद्देश**---एखादा भिक्षुक एखाद्या गृहस्थाच्या डामडौलास पाहून त्याजपाशीं अतिशायित जिकीर करित असतो कीं, ह्याजपासून आपल्यास कांहीं प्राप्त होईल, परंतु त्या गृहस्थापाशीं कांहीं एक नसतां बाहेरचाच मात्र डामडौल असतो. ह्या गोष्टीस ही अन्योक्ति लक्षून आहे

**टीप**---१४एक पक्षी आहे १५ पोकळ १७ साहवा ऋतु (माघ व फाल्गून) यांत २२ वारि म्ह० पाणी कण म्ह० अंश---पाण्याचा अंश ह्यास.

## मयूरान्योक्ति.

४ १ २ ५ ३ ६
**पक्षी या मलयावरी विहरतां लक्षावधी दीसती ॥**
८ ९ १० ७ ११ १२ १३
**केकी एकच धन्य त्यांत इतर क्षुद्रापरी भासती ॥**
१४ १६ १५ २० २१ १९ १८ १७
**जो शद्बें अपुल्या क्षणांत पळवी सर्पा सदर्पा महा ॥**
२२ २३ २५ २४ २६ २८ २९ २७
**जेणें चंदन सौख्यकारक जना होतीं; खरा थोर हा ॥ ५ ॥**

**अर्थ**---या मलय पर्वतावर लक्षावधि पक्षी क्रीडा कारितांना आपण पाहतों, परंतु त्यामध्यें मोर हाच एक धन्य आहे, आणि बाकीचे क्षुल्लक वाटतात. कारण जो मोर आपल्या शब्दानें मोठ्या भयंकर सर्पांना एका-